


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४२ । अंक ५ । फेब्रुवारी १९८९
किंमत ६ रुपये वार्षिक वर्गणी ४५ रुपये
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ३००/– संस्था : रु. ५००/–

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.

अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

संपादक
मे. पुं. रेगे

साहाय्यक संपादक
अ. र. कुलकर्णी, एस. डी. इनामदार,
अ. ना. ठाकूर.

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक;
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक;
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकासाठी 'स्थायी निधी' निर्माण केला आहे आणि अनुदानही दिले आहे.




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# श्रद्धांजली



## रा. पु. कोल्हटकर

जन्म : १६।११।१९३७ ] [ मृत्यू : १६।२।१९८९

प्राज्ञपाठशाळामंडळाचे सचिव श्री. रा. पु. ऊर्फ रामभाऊ कोल्हटकर यांचे दि. १६-२-८९ रोजी अल्पकालीन आजारानंतर अकाली आणि अनपेक्षितपणे निधन झाले.

रामभाऊ प्राज्ञपाठशाळामंडळाच्या परिसरात वाढले. कोल्हटकर कुटुंबाचे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या कुटुंबाशी घरोब्याचे नाते होते. त्यामुळे रामभाऊ बालपणापासूनच मंडळाच्या गोतावळचातील एक होते. तर्कतीर्थ १९६१ साली साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष झाल्यावर त्यांचे स्वीय सचिव म्हणून रामभाऊंची नेमणूक १९६१ मध्ये झाली. साहित्य संस्कृती मंडळाची कामे आणि त्यांच्या अंतर्गत विश्व-कोशाच्या रचनेचे आणि व्यवस्थापनाचे प्रचंड काम, प्राज्ञपाठशाळामंडळाची आणि विशेषतः धर्मकोशाच्या रचनेची कामे, आणि इतर सार्वजनिक कामे असे तर्कतीर्थांचे तिहेरी कार्यक्षेत्र होते. हा दुर्घट व्याप सांभाळण्यात स्वीय सचिव म्हणून रामभाऊंची जी जबाबदारी होती, ती त्यांनी १९६१ पासून ते मृत्यूपर्यंत अतुलनीय निष्ठेने आणि कार्यक्षमतेने पार पाडली. तर्कतीर्थांच्या सार्वजनिक, कौटुंबिक आणि वैयक्तिक जीवनाशी ते एकरूप झाले होते. त्यांचे स्वतःचे कौटुंबिक आणि वैयक्तिक जीवन ह्या महाप्रवाहात मिसळून गेले होते.

रामभाऊ माणसांचे लोभी होते. तर्कतीर्थांनी स्वाभाविकपणे केलेल्या लोक-संग्रहाच्या व्याप्तीत सबंध महाराष्ट्र आणि महाराष्ट्रीय समाजाचे सर्व थर सामावलेले

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहेत. राजकीय नेते, संस्कृत विद्यांतील पंडित, आधुनिक समाजशास्त्रज्ञ, वैज्ञानिक, कवी आणि साहित्यिक, सामाजिक परिवर्तनासाठी धडपडणारे ठिकठिकाणचे अप्रसिद्ध, जिद्दी कार्यकर्ते, पारंपरिक कीर्तनकार आणि प्रवचनकार, शासकीय अधिकारी आणि तंत्रज्ञ, प्रगत शेतकरी आणि वाईजवळच्या खेड्यांतील धनगर असा हा संमिश्र समूह आहे. रामभाऊंनी आपला आर्जवी स्वभाव, आस्था, निरपेक्षपणे लोकांच्या उपयोगी पडण्याची वृत्ती आणि कार्यकुशलता ह्या गुणांच्या जोरावर त्यांतील जवळजवळ प्रत्येकाशी वैयक्तिक स्नेहाचे नाते जोडले. विद्वत्ता, अधिकार, संपत्ती, वय यांतील फरक ह्या जिव्हाळ्याच्या स्नेहाच्या आड कधी आला नाही. ही त्यांची स्वतःची कमाई होती आणि हा त्यांच्या जीवनातील मोठा, जीवनाला सार्थकता देणारा आनंद होता. त्यांच्या अचानक झालेल्या मृत्यूमुळे महाराष्ट्रभर अगणित लोक हळहळले असणार.

ह्याच गुणांमुळे वाईच्या सार्वजनिक जीवनात त्यांनी स्वतःचे अनन्यसाधारण असे स्थान निर्माण केले होते. वाईतील प्रत्येक संस्थेशी त्यांचा औपचारिक किंवा अनौपचारिक असा संबंध होता. कोणत्याही संस्थेचे कार्यकर्ते त्यांना आपल्यातील एक मानीत, आणि त्यांच्याशी सल्लामसलत केल्याशिवाय काम अंगावर घेत नसत किंवा त्याची आखणी करीत नसत. हाती घेतलेले काम ते पार पाडतीलच म्हणून रामभाऊंवर विसंबून राहता येते असा सर्वांचा अनुभव होता. आणि अनेक सार्वजनिक कामांमागे त्यांची प्रेरणा आणि पुढाकार असे. वाईतील सर्व संस्थांना जोडणारा दुवा ही भूमिका त्यांची कार्यक्षमता, निरलसपणे कष्टत जाण्याची वृत्ती, आनंदी, मोकळा स्वभाव आणि प्रसिद्धिपराङ्मुखता ह्या त्यांच्या वैशिष्टयांमुळे त्यांच्याकडे चालत आली होती.

आनंदाने भरलेला आणि अनेक सार्वजनिक कार्यांनी गजबजलेला हा जीवनक्रम एकाएकी थांबला हा त्यांच्या कुटुंबियांना आणि त्यांच्या सहवासात आलेल्या सर्वांना मिळालेला मोठाच धक्का होता.

त्यांच्या मृत्यूने प्राज्ञपाठशाळामंडळावर झालेला आघात हा त्यांच्या कुटुंबियांवर झालेल्या आघातासारखाच असह्य आहे हे म्हणण्यात फार अतिशयोक्ती नाही. त्यापासून सावरण्याचे बळ त्यांच्या कुटुंबियांना आणि मंडळाला लाभो अशी प्रार्थना आहे.

■



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

फेब्रुवारी १९८९

## अ नु क्र म

संपादकीय



## लेखक-परिचय

■ **रामचन्द्र नारायण दांडेकर :** आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संस्कृत पंडित व भारतविद्यावंत; भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटच्यूट, पुणे–४११ ००४. ■ **विश्वास कानडे :** कथाकार; प्राध्यापक व प्रमुख, इंग्रजी पदव्युत्तर विभाग, नागपूर विद्यापीठ, नागपूर. निवास : २२, जीवनछायानगर, परसोडी, नागपूर–४४००२२. ■ **सुरेश र. देशपांडे :** मराठी विश्वकोशातील इतिहास, मानवशास्त्र, राज्यशास्त्र इ. विषयांचे संपादक. निवास : मराठी विश्वकोश कॉलनी, वाई (जि. सातारा) ४१२ ८०३. ■ **रा. ना. चव्हाण :** दलितमित्र; सामाजिक कार्यकर्ते, सामाजिक चळवळीचे चिकित्सक अभ्यासक व लेखक; १३७८ रविवार पेठ, वाई–४१२ ८०३. ■ **वसंत केशव पाटील :** कवी व लेखक; सद्गुरू गाडगे महाराज कॉलेज, कराड येथे मराठीचे प्राध्यापक; ४/९, भूपेश अपार्टमेंट, विद्यानगर, कराड (जि. सातारा) ४१५ ११०.

○ ○ ○

## चुकीची दुरुस्ती

'ऋग्वेदाचे भाष्यकार' हा डॉ. रा. ना. दांडेकर ह्यांचा लेख छापून झाल्यानंतर डॉ. दांडेकरांकडून काही सुधारणा सुचविल्या गेल्या. लेख छापून झाल्यामुळे त्या लेखातच करणे शक्य नव्हते. त्यामुळे त्या येथे नमूद करीत आहोत :

(१) पृ. ३, स्तंभ १, शेवटचा परिच्छेद, वाक्य दुसरे असे वाचावे–
"त्याने आपल्या भाष्याच्या[१२] सातव्या अष्टकाच्या शेवटी 'वनवासीविनिर्गताचार्योद्‌गीथस्य कृतावृग्वेदभाष्ये...' असा उल्लेख केला आहे."

(२) संदर्भ टीप ९ च्या पहिल्या ओळीतील "दुसऱ्या, तिसऱ्या," हा मजकूर गाळून ती टीप वाचावी.

(३) संदर्भ टीप १२ मध्ये इ. स. १९३९ याऐवजी इ. स. १९३५ असे वाचावे.

–संपादक




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत






द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई


अनुक्रमणिका

## संपादकीय

### हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (३)*

आधुनिक विचारात व्यक्तिवाद अनेक अंगांनी अवतीर्ण झाला असला तरी व्यक्तिवादाची स्थूलमानाने दोन रूपे आहेत असे म्हणता येईल : एक, उपयुक्ततावादी रूप आणि दुसरे कान्टवादी रूप.

उपयुक्ततावादी नीतिमागची प्रेरणा ही प्रामुख्याने विवेकवादाची ( रॅशनलिस्ट ) प्रेरणा आहे. सबंध मानवी ज्ञानाची विवेकाच्या (रीझन) अधिष्ठानावर पुनर्रचना करण्याचा कार्यक्रम, आधुनिक तत्त्वज्ञानाचे जनक देकार्त (Descartes) ह्यांनी, स्वतःसाठी स्वीकारला होता; नीतीला त्यांनी ह्या कार्यक्रमाच्या व्याप्तीतून वगळले होते. पण परंपरेने ज्याला ज्ञान म्हणून ओळखण्यात येते आणि ज्याचा ज्ञान म्हणून स्वीकार करण्यात येतो त्याच्या आशयाची विवेकाच्या निकषावर जशी चिकित्सा करता येते, त्यात प्रमाण काय आहे आणि अप्रमाण काय आहे, साधार काय आहे आणि निराधार काय आहे, भक्कम काय आहे आणि कमी-अधिक कमकुवत काय आहे हे भेद जसे करता येतात आणि जे प्रमाण, साधार आणि भक्कम ठरेल त्याची नव्याने तार्किक मांडणी जशी करता येते तशाच स्वरूपाची नीतीच्या आशयाचीही तार्किक चिकित्सा करता येईल.

पारंपरिक नीतीचा आशय संमिश्र आणि अव्यवस्थित असतो. त्याच्या मागचे सूत्र थोडक्यात असे : समाजाच्या संदर्भात व्यक्ती जी कोण असेल त्याला साजेसे तिने वागणे म्हणजे नीतीने वागणे. समाजाच्या संदर्भात व्यक्ती कोण आहे हे कसे ठरते ? व्यक्ती कोणत्या जातीची, वर्गाची, व्यवसायाची, कोणत्या कुटुंबातली आहे, ती स्त्री आहे की पुरुष आहे, तिचे वय काय ( उदा., ती लहान मुलगी आहे की लग्नाला आलेली जाणती मुलगी आहे की सून आहे की सासू आहे इ. ), तिचा धर्म काय, संप्रदाय काय इ. अनेक गोष्टींवरून ती कोण आहे हे निश्चित होते आणि ती ज्या प्रकारची व्यक्ती असेल त्याला साजेशा वागण्यात काय बसते आणि काय बसत नाही हे ठरते. अमुक जातीतील विधवेने केशवपन न करणे गैर ठरेल आणि अमुक जातीतील विधवेने केशवपन करणे गैर ठरेल, वडील माणसांशी बोलताना डोईवरून पदर न घेणे गैर ठरेल, अर्भकाची हेळसांड करणे गैर ठरेल, परपुरुषाच्या स्पर्शात आनंद घेणे गैर ठरेल, एकादशीला उपवास न करणे गैर ठरेल, उपासाला तांदळाचे पदार्थ खाणे गैर ठरेल (किंवा तांदळाशिवाय इतर कोणत्याही धान्याचे पदार्थ खाणे गैर ठरेल ), कुळाने धन्याशी बेइमानी करणे गैर ठरेल आणि धन्याने कुळाला अन्नावरून उठवणे गैर ठरेल, इ. कुटुंबात मिळणारी शिकवण, चारचौघे जे करतात आणि मानतात त्याच्याशी जुळवून घेण्याची माणसाची वृत्ती, व्रतवैकल्ये, मिथ्यकथा आणि कहाण्या ह्यांतून मिळणारे आदर्श आणि मानदंड, धर्मग्रंथ आणि साधुसंतांचा उपदेश अशा अनेक मार्गांनी पारंपरिक नीती भक्कमपणे समाजातील व्यक्तींच्या मनात बिंबविण्यात येते. व्यक्तींच्या ती इतकी अंगवळणी पडलेली असते की अन्य रीतीने वागणे, त्यांना अशक्य नसले तरी दुर्घट असते.

व्यक्तीची पारंपरिक नीती केवळ तिच्या सामाजिक स्थानावरून संपूर्णपणे निश्चित होते असे नाही. 'कुणाचाही हेवा करू नये' हे तत्त्व हे सर्वांसाठी आहे. हा 'साधारण-धर्म', सर्वांचा धर्म आहे. 'परोपकारः पुण्याय, पापाय परपीडनम्' हेही असेच साधारण-धर्म सांगणारे वचन आहे. 'प्रापंचिक गोष्टींवरून लक्ष काढून घेऊन परमार्थाकडे लावावे' हे तत्त्वही सामाजिक जीवनाचा घटक असलेल्या वैयक्तिक जीवनाची जी साध्ये आणि कर्तव्ये असतात त्यांपलीकडे असलेल्या वैयक्तिक साध्याशी आणि साधनेशी–मोक्षाशी आणि त्याच्याशी संलग्न असलेल्या साधनेशी–संबंधित आहे.

विवेकवादी नीती पारंपरिक नीतीच्या आशयाची विवेकाधिष्ठित तत्त्वाच्या अधिष्ठानावर पुनर्रचना करू पाहते. हे विवेकाधिष्ठित तत्त्व म्हणजे उपयुक्ततावादी तत्त्व होय. ह्या तत्त्वाचा आशय थोडक्यात असा

---

* या संपादकीयाचा पहिला व दुसरा भाग अनुक्रमे जुलै ८८ आणि जाने. ८९ च्या अंकात प्रसिद्ध झाला होता. हा तिसरा भाग. –संपादक.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्पष्ट करता येईल : आपल्याला जे हवे असते ते प्राप्त करून घेण्यासाठी माणूस कृती करतो. माणसाला जे प्राप्त करून घ्यायचे असते ते त्याचे साध्य असते, हे साध्य गाठण्याचे कृत्य हे साधन असते. साधन जर परिणामकारक असेल, म्हणजे आपले साध्य ते यशस्वीपणे सिद्ध करीत असेल तर ते योग्य ठरते. तेव्हा योग्य कृत्य म्हणजे साध्य सिद्ध करणारे कृत्य. आता माणसाचे जे साध्य असते त्याचे सामान्य वर्णन कसे करता येईल ? माणसाला काय हवे असते ? तर त्याच्या ज्या इच्छा असतात त्या तृप्त व्हाव्या हे त्याला हवे असते. इच्छातृप्तीत सुख असते. तेव्हा सुख हे माणसाचे साध्य असते आणि सुख निर्माण करणारे कृत्य, म्हणजे ज्याचे परिणाम सुखकारक असतात असे कृत्य हे योग्य कृत्य होय; म्हणजे माणसाने करावे असे किंवा नीतिमान कृत्य होय.

उपयुक्ततावादी तत्त्वाचे हे सार आहे. ह्या तत्त्वाची अधिक नेमकेपणे मांडणी करता येईल. सामान्यतः कृत्यांचे सुखद आणि दुःखद असे दोन्ही प्रकारचे परिणाम होतात. एखाद्या कृत्यामुळे काही इच्छा तृप्त होतात आणि सुख निर्माण होते; पण ते कृत्य इतर काही इच्छांच्या तृप्तीला प्रतिबंध करते आणि त्यातून दुःख निर्माण होते; कृत्याने जे सुख निर्माण होते त्यातून त्या कृत्यामुळे निर्माण होणारे दुःख वगळता जेवढे सुख बाकी उरेल त्याला 'सुखाचा शेष' म्हणू या. आता 'योग्य कृत्य' किंवा 'नीतिमान कृत्य' ह्याची व्याख्या अशी करता येईल : ज्या प्रकारचे कृत्य केले असता सामान्यपणे अधिकात अधिक सुखशेष निष्पन्न होतो—म्हणजे इतर कोणत्याही पर्यायी कृत्यामुळे जेवढा सुखशेष निर्माण होतो त्याहून अधिक सुखशेष ह्या कृत्यामुळे निर्माण होतो असे असेल—त्या प्रकारचे कृत्य नीतिमान कृत्य होय.

पारंपरिक नीतीच्या आशयाची चिकित्सा ह्या उपयुक्ततावादी तत्त्वाचा निकष लावून करता येईल. मग असे आढळून येईल की कित्येक पारंपरिक नीतिनियम उपयुक्ततावादी तत्त्वाशी सुसंगत आहेत. म्हणजे त्या नियमांना अनुसरून केलेल्या कृत्यांमुळे अधिकात अधिक सुखशेष निर्माण होतो. उदा., 'आईवडिलांनी आपल्या लहान अपत्यांचे पालनपोषण करावे' हा नियम. काही नियम उपयुक्ततावादी तत्त्वाचा भंग करणारे असतील. उदा., 'विधवेने फिरून लग्न करू नये.' ह्या नियमामुळे सामान्यपणे सुखशेषाऐवजी अधिकात अधिक दुःखशेष निर्माण होत असणार. आणि इतर काही नियम, त्यांना अनुसरून झालेल्या कृत्यांचा, सुखदुःखांशी फारसा काही संबंध नसल्यामुळे, निरर्थक ठरतील. उदा., 'अमुक जातीच्या माणसाने अमुक प्रकारचेच पागोटे वापरावे.' अशा रीतीने उपयुक्ततावादी तत्त्वाचा निकष लावल्याने जे पारंपरिक नीतिनियम प्रमाण म्हणून टिकून राहतील, त्यांची मिळून विवेकाधिष्ठित नीती बनेल. किंवा अलीकडे लोकप्रिय आणि प्रतिष्ठित असलेला शब्द वापरायचा तर ही वैज्ञानिक नीती असेल. प्रमाण ठरलेल्या पारंपरिक नीतिनियमांत, वेगवेगळ्या प्रकारची कृत्ये आणि त्यांचे होणारे सुखदुःखरूप परिणाम ह्यांच्या अनुभवाच्या आधारे, नवीन नीतिनियमांची भर घालून, विवेकाधिष्ठित नीतीचा विस्तार करता येईल.

येथे एक प्रश्न उपस्थित होतो. ज्या सुखदुःखात्मक परिणामांच्या आधाराने कृत्याची नीतिमत्ता आपण ठरवितो ती कुणाची सुखदुःखे ? माणूस जे चांगले किंवा वाईट कृत्य करतो त्याचे त्याच्या स्वतःच्या सुखदुःखावर जसे परिणाम होतात तसे इतरांच्या सुखदुःखावरही होतात. मग कृत्य नैतिक-अनैतिक आहे, चांगले-वाईट आहे हे ठरविताना कुणाच्या किंवा कुणाकुणाच्या सुखदुःखांची बेरीज-वजाबाकी करणे योग्य किंवा आवश्यक असते ? ह्याचे एक उत्तर असे की 'कुणाच्याही.' एखाद्या कृत्याचे समाजातील ज्या ज्या म्हणून व्यक्तींवर सुखदुःखात्मक परिणाम घडलेले असतील त्या सर्व परिणामांची बेरीज-वजाबाकी करून ते ते कृत्य नैतिक आहे की नाही, हे ठरविले पाहिजे. 'सर्वांत जास्त संख्येचे सर्वांत जास्त सुख' हे नैतिक कृत्याचे साध्य असते ह्या प्रसिद्ध वचनात हे उत्तर ग्रथित करण्यात आले आहे.

ह्या उत्तराद्वारा समतेचे तत्त्व एका स्वरूपात मांडण्यात आले आहे. कोणत्याही कृत्याची नैतिकता अजमवताना त्याच्यापासून निष्पन्न होणाऱ्या सुखदुःखांचा जो हिशेब करायचा त्यात कोणत्याही दोन व्यक्तींच्या समान सुखदुःखाचे मूल्य समान मानले पाहिजे ह्या स्वरूपात समानतेचे तत्त्व वरील वचनात अनुस्यूत आहे. समजा अ हे एक कृत्य आहे आणि त्याचे परिणाम फक्त क्ष, य आणि ज्ञ ह्या तीन व्यक्तींच्या सुख-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दुःखावर होतात. समजा अ-मुळे क्ष-ला ५ एकक एवढे सुख लाभते; आणि य-ला १० एकक आणि ज्ञ-ला ८ एकक एवढे सुख मिळते. म्हणजे अ-मुळे एकंदर २३ एकक एवढे सुख निर्माण होते; दुःख काहीच निर्माण होत नाही. आता समजा ब हे दुसरे पर्यायी कृत्य आहे आणि त्यापासून क्ष-ला १० एकक, य-ला ५ एकक, आणि ज्ञ-ला ६ एकक सुख मिळते; दुःख कोणालाच मिळत नाही. म्हणजे ब-पासून २१ एकक सुख निष्पन्न होते; दुःख काहीच निष्पन्न होत नाही. तेव्हा उपयुक्ततावादी निकषाप्रमाणे अ हे कृत्य ब ह्या कृत्यापेक्षा अधिक नैतिक होय. कारण अ-पासून निष्पन्न होणारा सुखशेष ब-पासून निष्पन्न होणाऱ्या सुखशेषापेक्षा जास्त आहे. आता समजा क्ष हा ब्राह्मण आहे ( किंवा उमराव आहे ) आणि य आणि ज्ञ हे शूद्र आहेत ( किंवा भूदास आहेत ). पण कुणाला म्हणता येणार नाही की ज्या अर्थी क्ष हा ब्राह्मण ( किंवा उमराव ) आहे आणि इतर दोघे शूद्र (किंवा भूदास ) आहेत त्या अर्थी क्ष-च्या सुखाचे मूल्य इतर दोघांच्या सुखाहून स्वरूपतःच श्रेष्ठ आहे आणि म्हणून अ-पासून क्ष-ला जेवढे सुख लाभते त्याहून त्याला ब-पासून अधिक सुख लाभत असल्यामुळे, जरी अ-पासून निर्माण होणारे एकंदरीत सुख ब-पासून निर्माण होणाऱ्या एकंदरीत सुखापेक्षा जास्त असले तरी अ-पेक्षा ब हे कृत्यच नैतिक दृष्टचा श्रेष्ठतर आहे. व्यक्ती ही सुखदुःखाची धारक आहे किंवा भोक्ती आहे; सुख-दुःख व्यक्ती अनुभवते. आणि सुख-दुःखाच्या भोक्त्या म्हणून सर्व व्यक्ती समान असतात. कृत्यांची नैतिकता ठरविण्यासाठी सुखदुःखाचा हिशोब करताना संबंधित व्यक्तींची सर्व वर्णने गैरलागू असतात; म्हणजे जात, धर्म, वंश, कौशल्ये, कर्तबगारी, उंची, वजन, सामाजिक स्थान इ. दोन कृत्यांमधून नैतिक निवड करताना फक्त एकाच गोष्टीचा विचार प्रस्तुत ठरतो. तो हा की त्यांतील कोणत्या कृत्यामुळे अधिक सुखशेष निर्माण होतो ? जर त्या दोन कृत्यांमुळे समान सुखशेष निर्माण होत असेल तर त्यांची नैतिकता सारखीच असते; त्यांतून निवड करण्यासारखे काहीच नसते. पण त्यांतील एकापासून जर अधिक सुखशेष निर्माण होत असेल तर ते दुसऱ्या कृत्याहून नैतिक दृष्टचा श्रेष्ठ असते.

पण याचा अर्थ असा होतो की उपयुक्ततावादी तत्त्वाच्या ह्या मांडणीपासून, कृत्यांपासून निष्पन्न होणाऱ्या सुखदुःखांची वाटणी करण्याचे तत्त्व मिळत नाही हे उघड आहे. ज्या प्रकारच्या कृत्याने अन्य प्रकारच्या कृत्याहून अधिक सुखशेष निर्माण होतो ते कृत्य तुलनेने अधिक चांगले एवढेच हे तत्त्व म्हणते, मग ह्या सुखशेषाचे अंश कोणत्याही प्रमाणात कुणाकुणाच्याही वाटचाला येत असोत. पण माणसे केवळ सुख-दुःखाचे धारक, अनुभव घेणारे एवढेच नसतात. सुखाचा अनुभव त्यांना हवा असतो; दुःखाचा नकोसा असतो. उपयुक्ततावादी तत्त्वाची वरील मांडणी पारंपरिक नीतीच्या आशयातील ' अविवेकी ' ( इर्रॅशनल ) घटक, म्हणजे माणसांच्या सुखदुःखाशी संबंधित नसलेली किंवा अधिक दुःख निर्माण करणारी पण नैतिक दृष्टचा बंधनकारक म्हणून मानण्यात आलेली कृत्ये, तिच्यातून वगळण्यासाठी आवश्यक आहे आणि समर्थही आहे. पण नैतिक आचरणामुळे निर्माण होणाऱ्या सुखशेषाचे योग्य वाटप कसे करायचे ह्या प्रश्नाचे उत्तर ही मांडणी देऊ शकत नाही. आणि ह्या प्रश्नाचा न्यायाच्या संकल्पनेशी संबंध पोचतो.

तेव्हा उपयुक्ततावादी तत्त्वाची वेगळचा प्रकारे मांडणी करावी लागते. ती अशी : माणसे केवळ सुखदुःखाचे भोक्ते नसतात, प्रत्येक माणसाला स्वतःचे सुख हवे असते आणि दुःख नको असते. आणि स्वतःचे सुख साधण्यासाठी व दुःख टाळण्यासाठी तो आवश्यक किंवा अनुकूल ठरतील अशी कृत्ये करतो. तेव्हा स्वतःचे सुख साधण्यासाठी कृत्ये करणारा कर्ता हे सर्व माणसांचे समान स्वरूप आहे आणि हे समान स्वरूप मानवी समतेचे अधिष्ठान आहे.

ह्या स्वरूपातून 'माणसाचे हक्क' ही संकल्पना उदयाला येते. प्रत्येक माणसाला स्वतःचे सुख साधण्याचा—स्वतःचे सुख साधण्यासाठी त्याला आवश्यक वाटतील अशी कृत्ये करण्याचा—हक्क आहे. आणि सर्व माणसांना समान असलेला हा हक्क आहे. ह्या हक्कात इतर काही हक्क अभिप्रेत, अनुस्यूत आहेत. माणसाने स्वतःचे सुख संपादन करायचे तर त्यासाठी तो जिवंत राहिला पाहिजे आणि सुखप्राप्तीसाठी त्याला इष्ट वाटतील अशी कृत्ये करायला तो पूर्णपणे मोकळा असला पाहिजे. तेव्हा ' जीवित, स्वातंत्र्य आणि सुखसंपादन ' ह्यांचे हक्क ही हक्कांची त्रिमूर्ती प्राप्त होते. पण एवढचाने भागत नाही. इच्छांचे समाधान होण्यात सुख असते,








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इच्छांचे समाधान करण्यासाठी भौतिक साधने आवश्यक असतात आणि माणसांना ती श्रम करून उत्पन्न करावी लागतात. तेव्हा व्यक्ती स्वतःच्या श्रमाने आपल्या इच्छांच्या तृप्तीसाठी जी साधने बनवील त्यांच्यावर तिचा काबू असला पाहिजे म्हणजे स्वामित्व असले पाहिजे. तेव्हा स्वतःच्या श्रमाने निर्माण केलेल्या साधन-संपत्तीवरील माणसाचा हक्क मान्य केला पाहिजे. म्हणजे मालमत्तेचा हक्क स्वीकारावा लागतो.

हे हक्क सर्व माणसांना समान आहेत. समाजव्यवस्थेत आणि सामाजिक व्यवहारात सर्व घटक-व्यक्तींचे हे समान हक्क मान्य असण्यात आणि प्रत्यक्षात त्यांचा आदर होत असण्यात न्याय असतो. काही व्यक्तींना किंवा काही प्रकारच्या व्यक्तींना–उदा., शूद्रांना किंवा स्त्रियांना–हे हक्क नाकारले जात असतील तर तो त्यांच्यावरील अन्याय आहे. किंवा एखाद्या व्यक्तीच्या ह्या हक्कांवर इतरांनी अतिक्रमण केले तर तोही अन्याय आहे.

दुसऱ्या शब्दांत ही गोष्ट मांडायची झाली तर समाजातील सर्व व्यक्तींना स्वतःचे सुख संपादन करण्याची समान संधी असण्यात न्याय असतो. 'समान संधी' ह्या संकल्पनेत गर्भित असलेला आशय तपशीलात शिरून स्पष्ट करावा लागेल. उदा., प्रत्येक व्यक्तीला आपले सुख संपादन करण्यासाठी आवश्यक वाटतील ती कृत्ये करण्याचे जास्तीत जास्त स्वातंत्र्य असले पाहिजे. अर्थात इतरांच्या अशाच स्वातंत्र्याशी सुसंगत ठरेल अशा रीतीने तिला हे स्वातंत्र्य भोगावे लागेल. जर काही व्यक्तींना असे स्वातंत्र्य नसेल, उदा., स्त्रियांना घराबाहेर पडण्याची बंदी असेल तर त्यांना समान संधी नाही असे होईल व हा अन्याय आहे. वेगवेगळ्या प्रकारच्या अशा प्रतिबंधांमुळे समाजातील काही प्रकारच्या व्यक्तींच्या स्वातंत्र्याचा कमी-अधिक संकोच झालेला असण्यात जी विषमता असते ती संधीची विषमता असते आणि ती अन्याय असते हे तर झालेच. पण पुढे जाऊन असा विचार करता येईल : स्वतःच्या श्रमाने उत्पादन केलेल्या भौतिक सुखसाधनांवरील व्यक्तीचे स्वामित्व सुरक्षित राखले जाण्यात न्याय आहे. तेव्हा सर्व व्यक्तींना असे उत्पादन करण्याचे व उत्पादित वस्तूंचा उपयोग करण्याची समान संधी असली पाहिजे. आता सुसंस्कृत समाजात असे उत्पादन करण्याची पूर्वतयारी म्हणून व्यक्तीला ज्ञान आणि कौशल्ये संपादन करावी लागतात. म्हणजे शिक्षण घ्यावे लागते. तेव्हा शिक्षण घेण्याची समान संधी हा 'समान संधी' ह्या संकल्पनेचा महत्त्वाचा घटक आहे. आता काही प्रकारच्या व्यक्तींना शिक्षण घेण्यास प्रतिबंध असेल तर तो सरळ अन्याय आहे. पण एवढ्याने भागत नाही. जरी कुणाही व्यक्तीला शिक्षण घेण्याला प्रतिबंध नसला पण प्रत्यक्षात शिक्षण घेण्यासारखी त्यांची परिस्थिती नसली तरी त्यांना शिक्षणाची समान संधी नाही असेच म्हणावे लागते. उदा., काही मुलांना आपल्या कुटुंबाच्या उदरनिर्वाहासाठी काम करावे लागत असल्यामुळे जर शाळेत जाता येत नसेल, तर त्यांना शाळेत प्रवेश नाकारणारा नियम नसला तरी, त्यांना शिक्षणाची संधी नाही व हा अन्याय आहे हे मान्य करावे लागते.

तेव्हा सर्व व्यक्तींचे समान हक्क आणि ते उपभोगण्याची समान संधी हा न्यायाच्या संकल्पनेचा गाभा आणि पाया आहे.

पण काही प्रकारची विषमता न्यायाला धरून असते. उद्योगी व्यक्तीने अधिक कष्ट करून जर अधिक उत्पादन केले तर आळशी माणसापेक्षा तो अधिक संपन्न होईल. पण ही विषमता न्यायाशी सुसंगत आहे एवढेच नव्हे तर ती न्यायाच्या तत्त्वापासून अनिवार्यपणे निष्पन्न होते. इतर काही कारण नसताना त्याच्याकडे असलेली अधिक संपत्ती त्याच्यापासून हिरावून घेऊन इतरांना वाटून देणे अन्याय्य ठरेल.

पारंपरिक समाजात अनेक प्रकारच्या व्यक्तींना समान हक्क, समान संधी, समान स्वातंत्र्य नाकारण्यात आले होते. तेव्हा अन्यायावर आधारलेला असा तो समाज होता. सर्व व्यक्तींचे समान हक्क ह्या तत्त्वाला अनुसरून पारंपरिक समाजाची पुनर्रचना करणे नैतिक दृष्ट्या आवश्यक आहे. हिंदू समाजाला स्वतःसाठी ते करावे लागेल. ( अपूर्ण )



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ऋग्वेदाचे भाष्यकार

रामचन्द्र नारायण दांडेकर

"वेदांचे भाष्यकार" हा आधुनिक वेदविद्येच्या क्षेत्रातील एक वराचसा दुर्लक्षित असा विषय होता.* पण अलीकडे मात्र ही परिस्थिती लक्षणीय रीत्या सुधारली आहे. अनेक वेदभाष्याकारांसंबंधी उपलब्ध झालेली नवी माहिती व अनेक अप्रसिद्ध वेदभाष्यांचे अंशत: का होईना झालेले प्रकाशन हे गेल्या काही वर्षातील वेदाभ्यासाचे एक महत्त्वाचे फलित आहे असे म्हणता येईल. वेदार्थज्ञानाच्या साधनांची परंपरा फार प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे. तसे पाहिले तर, ऋग्वेदाची (या भाषणात मला मुख्यत: ऋग्वेदच अभिप्रेत आहे) मण्डलव्यवस्था हेही वेदार्थज्ञानाचे एक उपयुक्त साधन आहे हे सहज आपल्या लक्षात येईल. ऋग्वेदाची अष्टक-अध्यायवर्ग ही विभागणी स्वाध्यायासाठी व्यावहारिक दृष्टीने केलेली आहे. मुख्यत: ऋषी (म्हणजेच, आधुनिक अर्थाने, लेखक किंवा कवी) आणि देवता (म्हणजेच, आधुनिक अर्थाने, विषय) लक्षात घेऊन केलेले ऋग्वेदीय मन्त्रांचे संहितीकरण म्हणजे मण्डलव्यवस्था. एखाद्या वाङ्मयकृतीचे सम्यक आकलन होण्यास त्या वाङ्मयकृतीचे लेखक-कवी आणि विषय यांच्याविषयीचे प्राथमिक ज्ञान, प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे, साहाय्यभूत होऊ शकते. ऋग्वेदाचा पदपाठही त्या वेदाच्या अर्थज्ञानास चांगलाच उपयुक्त ठरतो. ब्राह्मणग्रंथांनी ऋग्वेदीय मंत्रांचा अर्थ एका विशिष्ट दृष्टीने–म्हणजे प्रधानतया यागीय दृष्टीने–केला असला, तरी वेदार्थज्ञानाचे एक साधन म्हणून त्यांचे महत्त्व नाकारता येत नाही. मण्डलव्यवस्था, पदपाठ, आणि ब्राह्मणे ही वेदार्थज्ञानाच्या साधनांच्या परंपरेचा पहिला स्तर दर्शवितात. दुसरा स्तर म्हणजे वेदाङ्गे. या दोन स्तरांत ही परंपरा कालदृष्टचा अखंडित चालू राहिली होती असे म्हणावयास हरकत नाही. दुसऱ्या स्तरानंतर (इसवीसनपूर्व सहाव्या-पाचव्या शतकानंतर) मात्र या वेदार्थज्ञानसाधनपरंपरेत फार मोठा–म्हणजे जवळजवळ ११००-१२०० वर्षांचा– खंड पडला. कारण तिसऱ्या, म्हणजे वेदभाष्यकारांच्या, स्तराचा प्रारंभ, आज उपलब्ध असलेल्या पुराव्यांवरून, इसवी सनाच्या सातव्या शतकात झाला असे म्हणता येते.

ऋग्वेदाच्या संस्कृत भाषेतील भाष्यकारांचे सामान्यपणे पाच मुख्य वर्ग कल्पिता येतात. ते असे : (१) ज्यांची भाष्ये संपूर्णपणे प्रकाशित स्वरूपात उपलब्ध आहेत असे भाष्यकार; (२) ज्यांनी संपूर्ण भाष्ये लिहिली असावीत असे अनुमान करता येते, पण ज्यांच्या भाष्यांपैकी फक्त काही भागच उपलब्ध झाला आहे असे भाष्यकार; (३) ज्यांनी काही विशिष्ट ऋङ्मन्त्रांवरच भाष्य केले आहे असे भाष्यकार; (४) ऋग्वेद-भाष्यकार म्हणून ज्यांचा वाङ्मयात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष उल्लेख येतो, पण ज्यांच्या भाष्यांचा काहीही भाग उपलब्ध झालेला नाही असे भाष्यकार; आणि (५) आधुनिक काळातील ऋग्वेद-भाष्यकार. यांपैकी पहिल्या वर्गात फक्त सायणाचार्यांचा अन्तर्भाव करता येईल. वेङ्कटमाधवाचाही याच वर्गात अन्तर्भाव करावा असे मला प्रथम वाटले. पण मी स्वत: त्याच्या "ऋगर्थदीपिके"तील फक्त काही अष्टकेच प्रसिद्ध झालेली पाहिली आहेत, म्हणून त्याचा अन्तर्भाव मी भाष्यकारांच्या दुसऱ्या वर्गात करणार आहे. सायणाचे[1] (१३१६–१३८८) ऋग्वेदावरील "वेदार्थप्रकाश" हे भाष्य सर्वविख्यात आहे. त्यामुळे त्यासंबंधी मी फारसे बोलणार नाही. सायणभाष्याच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "इति श्रीमद्राजाधिराज परमेश्वर वैदिक मार्गप्रवर्तक श्री वीर बुक्क भूपाल साम्राज्यधुरंधरेण[१] सायणाचार्येण विरचिते माधवीये वेदार्थप्रकाशे ऋक्सं-

---

* फर्ग्युसन कॉलेज, पुणे येथील संस्कृत विभागाच्या विद्यमाने 'वेदावरील भाष्यकार' या विषयावर एक एकाइ चर्चासत्र २६ जानेवारी १९८६ या दिवशी आयोजित करण्यात आले होते. त्या चर्चासत्राच्या उद्घाटनाच्या निमित्ताने केलेले भाषण.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हिताभाष्ये ..." अशी पुष्पिका आली आहे. त्या पुष्पिकेतील 'माधवीये' या शब्दावरून या भाष्याच्या रचनेत सायणाचा भाऊ माधव[३] याचाही सहभाग असावा असे दिसून येते. किंबहुना, "वेदप्रकाशा"ची रचना सायणाने अनेक पंडितांच्या साहाय्याने केली असली पाहिजे या उपपत्तीस उपोद्बलक असा बराचसा पुरावा त्या भाष्यात मिळतो.[४] सायणाचे ऋग्वेदभाष्य सर्वप्रसिद्ध असले तरी ते सर्वोत्कृष्ट आहे असे म्हणता येणार नाही. त्यातील काही त्रुटिते व चुका तर सहज लक्षात येण्यासारख्या आहेत. सायणभाष्यात स्कन्दस्वामी वगैरे काही पूर्वसूरींचे उल्लेख आले असले तरी सायणाने एखादी विशिष्ट परंपरा अनुसरली होती असे दिसत नाही. सायणाने ऋग्वेदाचा अर्थ प्राधान्याने यज्ञपर असा लावला आहे.[५] आपल्या विवेचनात त्याने व्याकरणाचाही भरपूर उपयोग केला आहे. अनेक ठिकाणी त्याने मन्त्रांतील शब्दांची आनुपूर्वी बदलली आहे. तसेच, त्याने एकाच मन्त्राचा निरनिराळ्या संदर्भांत निरनिराळा अर्थ दिला आहे. त्यामुळे त्याच्या भाष्यात अर्थविसंगती व अर्थवैक्लव्य हे दोष निर्माण झाले आहेत. हे काही असले तरी संपूर्ण ऋग्वेदावरील प्रकाशित स्वरूपात उपलब्ध असलेले एकमेव भाष्य या दृष्टीने "वेदार्थप्रकाशा"चे महत्त्व वादातीत आहे. सायणभाष्याच्या उपयुक्ततेसंबंधी मात्र आधुनिक वेदाभ्यासकांत दोन परस्परविरोधी मतप्रवाह दिसून येतात. सायणभाष्य उपलब्ध झाले नसते तर अलीकडील ऋग्वेदाभ्यासाचा प्रारंभच होऊ शकला नसता हे एका टोकाचे मत,[६] तर सायणभाष्याला कटाक्षाने बाजूस सारल्याखेरीज ऋग्वेदविषयक शास्त्रशुद्ध संशोधनात योग्य प्रगती होऊ शकणार नाही हे दुसऱ्या टोकाचे मत.[७] अर्थात, नेहमीच्या अनुभवानुसार, या दोन टोकांच्या मध्येच कुठेतरी या वादाचे निर्णायक उत्तर आपणास मिळू शकेल.

दुसऱ्या वर्गातील भाष्यकारांत प्रथम नामोल्लेख करावा लागेल तो स्कन्दस्वामींचा. आज उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून असे म्हणता येईल, की वेदार्थ ज्ञानसाधनपरंपरेच्या तिसऱ्या स्तराची सुरुवात स्कन्दस्वामींपासूनच होते. स्कन्दस्वामींचा काल बव्हंशी निश्चितपणे ठरविता येण्यासारखा आहे. शतपथब्राह्मणाचा भाष्यकार हरिस्वामी हा स्कन्दस्वामीला आपला गुरू मानतो. त्याने आपल्या शतपथब्राह्मणभाष्याचा काल कलियुगाचे ३७४० वे वर्ष, म्हणजेच इ. स. ६३८ असा दिला आहे. यावरून स्कन्दस्वामींचा काल इ. स. ६०० च्या सुमारास असला पाहिजे असे अनुमान करता येते. स्कन्दस्वामीने आपल्या ऋग्वेदभाष्याच्या प्रथमाष्टकातील प्रथमाध्यायाच्या शेवटी आपला स्वतःचा 'वलभिनिवासी' आणि 'भर्तृध्रुवाचा' पुत्र' असा निर्देश केलेला आहे. स्कन्दस्वामींचा उल्लेख वेङ्कटमाधव (१० वे शतक), आत्मानन्द (१२ वे शतक), निघण्टुभाष्यकार देवराजयज्वन् (१४ वे शतक), आणि सायण (१४ वे शतक) यांनी आपल्या भाष्यांत केलेला आढळतो. "ऋगर्थदीपिके"च्या आठव्या अष्टकातील चवथ्या अध्यायाच्या भूमिकेत वेङ्कटमाधव म्हणतो :

स्कन्दस्वामी नारायण उद्गीथ इति(च) क्रमात् ।
चक्रुः सहैकमृग्भाष्यं पदवाक्यार्थगोचरम् ॥

यावरून असे सूचित होते की, ऋग्वेदाच्या पहिल्या काही भागावर स्कन्दस्वामीने, मध्यभागावर नारायणाने व शेवटच्या भागावर उद्गीथाने असे तिघांनी मिळून भाष्य लिहिले. पण वेङ्कटमाधवाचे हे विधान शब्दशः आणि संपूर्णतया प्रमाण मानता येईल किंवा नाही याविषयी दाट शंका वाटते. किंबहुना ते तसे प्रमाण मानता येणार नाही अशीच स्कन्दस्वामी व उद्गीथ यांच्या प्रकाशित झालेल्या भाष्यांशावरून आपली खात्री पटते. स्कन्दस्वामीने आपल्या भाष्यास "ऋगर्थागमसंहृति" असे नाव दिले आहे.[८] त्यावरून त्याच्या पूर्वी मोठी ऋगर्थपरंपरा अस्तित्वात होती असे दिसते. पण ही परंपरा भाष्यकारांची होती असे वाटत नाही. वेदार्थज्ञानसाधनपरंपरेचे पहिले दोन स्तर त्याला अभिप्रेत असावेत. स्कन्दस्वामी हा वैष्णव, आश्वलायनसूत्रानुसारी, व शाकलशाखाध्यायी होता अशी माहिती आपणास मिळते. स्कन्दस्वामीनेही ऋग्मन्त्रांचा अर्थ यज्ञपरच लावला आहे, पण प्रत्येक सूक्ताचा विनियोग त्याने दिलेला नाही. स्वर आणि छन्द यांकडेही त्याने फारसे लक्ष दिलेले नाही. दैवतशास्त्र व पुराकथा यांच्या बाबतीत स्कन्दस्वामी बऱ्याच प्रमाणात परंपराविरोधी होता. ऋग्वेदीय पुराकथांच्या संदर्भात त्याने महाभारताचा व रामायणाचा उल्लेख केला आहे. स्कन्दस्वामींच्या नावावर प्रसिद्ध असलेले निरुक्तभाष्य ऋग्वेदभाष्यकार स्कन्दस्वामीनेच लिहिले आहे किंवा नाही हा प्रश्न अद्यापि वादाधीन आहे.[१०]

खरे पाहिले तर, नारायणाचा समावेश वर उल्लेखिलेल्या भाष्यकारांच्या चवथ्या वर्गात करावयास






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाहिजे. कारण ऋग्वेदभाष्यकार म्हणून जरी तो ज्ञात असला, तरी त्याने लिहिलेल्या भाष्याचा थोडाही अंश आज उपलब्ध नाही. पण स्कन्दस्वामी, नारायण आणि उद्गीथ या तिघांनी सहकार्याने एका ऋग्वेदभाष्याची रचना केली या वेङ्कटमाधवाने सांगितलेल्या परंपरेच्या आधारावर स्कन्दस्वामी व उद्गीथ यांच्या प्रसिद्ध झालेल्या भाष्यांशांत नारायणाचा सहभाग असणे शक्य आहे अशी मी कल्पना केली आणि त्या दोघांबरोबर नारायणाचाही या दुसऱ्या वर्गातच अंतर्भाव करण्याचे ठरविले. नारायणाविषयी फारशी माहिती मिळत नाही. "सामविवरण"कार माधवाचा तो पिता होता असे सामान्यपणे मानण्यात येते. पंडित साम्बशिवशास्त्री आपल्या "सामविवरणा"च्या आवृत्तीच्या उपोद्घातात म्हणतात :

'स्कन्दस्वामिसहचरनारायणपण्डितस्य सुतत्वेन संभावितस्य माधवपण्डितस्य कृतौ सामवेद-व्याख्यायामुपक्रमे...'

कालदृष्टया हे संभवनीय आहे. माधवाने आपल्या "सामविवरणा"त 'रजोजुषे जन्मनि सत्त्ववृत्तये...' हा मङ्गल श्लोक दिलेला आहे. हाच श्लोक बाणभट्टाने आपल्या "कादम्बरी"तही मङ्गल श्लोक म्हणून दिलेला आहे. यावरून "सामविवरण"कार माधव बाणभट्टाचा ज्येष्ठ समकालीन व अनुग्रहीता असावा असे अनुमान करण्यात आले आहे. बाणभट्ट हा हर्षाचा (राज्य : इ. स. ६०६–६४६) आश्रित. म्हणजे, माधव व बाणभट्ट यांच्या कर्तृत्वाचा काल इ. स. ६३०–६४० असा मानता येतो. स्कन्दस्वामींचा काल इ. स. ६०० च्या सुमाराचा; आणि नारायण हा स्कन्दस्वामींचा समकालीन; अशी ही कालाची नीट संगती लागू शकते.[११]

उद्गीथ हा स्कन्दस्वामी व नारायण यांचा समकालीन (इ. स. ६०० च्या सुमारास). त्याने आपल्या भाष्याच्या[१२] प्रत्येक अध्यायाच्या शेवटी 'वनवासिविनिर्गताचार्यस्य उद्गीथस्य कृता ऋग्वेदभाष्ये...' असा उल्लेख केलेला आहे. यातील 'वनवासि' हे 'वलभिनिवासि' या शब्दाचे विकृत स्वरूप असावे. स्कन्दस्वामीप्रमाणे उद्गीथही वलभीचा रहिवासी असला पाहिजे. किंबहुना इसवी सनाच्या सातव्या शतकात वेदभाष्यकारांचा एक स्वतंत्र 'वलभिसंप्रदाय' निर्माण झाला असावा असे मत या संदर्भात पुढे मांडले गेले आहे. स्कन्दस्वामी, नारायण, उद्गीथ, "निरुक्तभाष्य-टीका'कार महेश्वर, "सामविवरण"कार माधव, आणि "शतपथब्राह्मणभाष्य"कार हरिस्वामी हे या संप्रदायाचे प्रमुख प्रवर्तक होते. आत्मानन्द व सायण यांनी आपल्या भाष्यात उद्गीथाचा उल्लेख केलेला आहे. उद्गीथाने ऋग्वेदाचा अर्थ मुख्यतः वैदिक यज्ञ-संस्थेच्या अनुषंगानेच लावलेला आहे. या बाबतीत, स्कन्दस्वामीने आपला ज्येष्ठ सहकारी उद्गीथ याचे अनुसरण केले असावे असे म्हटले जाते. पण या म्हणण्याला पुष्टिदायक किंवा विरोधी असा फारसा पुरावा मिळत नाही.

ऋग्वेदाचा एक साक्षेपी भाष्यकार म्हणून वेङ्कटमाधवाला गेल्या काही वर्षांत मोठी प्रसिद्धी मिळाली आहे. शुक्लयजुर्वेदभाष्यकार महिधर, निघण्टुभाष्यकार देवराजयज्वन्, आणि ऋग्वेदभाष्यकार सायण यांनी आपल्या भाष्यांत माधवाचा (किंवा माधवभट्टाचा) उल्लेख केलेला आहे ही गोष्ट खरी; पण सुमारे ५० वर्षांपूर्वी वेङ्कटमाधवाच्या "ऋगर्थदीपिके"च्या काही भागाचे प्रथम प्रकाशन झाले.[१३] तेव्हापासून या भाष्यकाराकडे वेदाभ्यासकांचे लक्ष विशेषत्वाने जाऊ लागले. जगदेकवीराच्या आधिपत्याखालील चोलदेशातील कावेरी नदीच्या दक्षिण तीरावरील गोमान् नावाच्या गावाचा रहिवासी असा वेङ्कटमाधवाने आपला स्वतःचा परिचय करून दिला आहे. त्याच्या पित्याचे नाव वेङ्कटाचार्य,[१४] मातेचे नाव सुन्दरी, आणि गोत्र कौशिक होते. जगदेकवीराचा– म्हणजेच वेङ्कटमाधवाचा– काल इ. स. दहावे शतक हा होता. शुक्लयजुर्वेदभाष्यकार महीधराने (इ. स. ११००) माधव नावाच्या एका पूर्वकालीन वेदभाष्यकाराचा उल्लेख केला आहे. तो माधव म्हणजे वेङ्कटमाधवच असणे अगदी शक्य आहे. सायणाने वेङ्कटमाधवाचा निर्देश माधवभट्ट असा केलेला आहे. देवराजाने सामान्यपणे माधव असा निर्देश केलेला असला तरी आपल्या "निघण्टुभाष्या"च्या उपोद्घातात मात्र त्याने 'श्रीवेङ्कटाचार्यतनयस्य माधवस्य भाष्यकृतौ...' असा उल्लेख केलेला आहे. पण देवराजाने माधवाची म्हणून जी उद्धरणे दिली आहेत त्यांपैकी काही वेङ्कटमाधवाच्या भाष्यात सापडतात तर काही सापडत नाहीत. याचे स्पष्टीकरण कसे करावयाचे?[१५] या संदर्भात दोन पर्याय संभवतात. पहिला पर्याय म्हणजे माधव नावाच्या दोन वेगळेगळ्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भाष्यकारांचे उतारे देवराजाने दिले आहेत. दुसरा पर्याय असा की, वेङ्कटमाधवाने दोन ऋग्वेदभाष्ये रचिली होती, आणि देवराजाने काही ठिकाणी एका भाष्यातले तर काही ठिकाणी दुसऱ्या भाष्यातले उतारे दिलेले असावेत. निघण्टुभाष्य १.१४.१८ या ठिकाणी देवराजाने 'इत्यत्र माधवस्य प्रथमभाष्यम्' असे शब्द उपयोजिले आहेत. यावरून वेङ्कटमाधवाने प्रथम आणि द्वितीय[१६] अशी दोन भाष्ये रचिली असली पाहिजेत असे अनुमान करण्यात आले आहे. पण हे अनुमान प्रत्ययदायी वाटत नाही. एक तर 'प्रथमभाष्य' असा शब्दप्रयोग देवराजाने एकदाच केलेला आहे. इतर ठिकाणच्या उदाहरणांच्या संदर्भात अमुक उदाहरण 'प्रथमभाष्यातील' आणि अमुक 'द्वितीयभाष्यातील' असा भेद त्याने दर्शविलेला नाही.[१७] शिवाय, स्वतः वेङ्कटमाधवाने आपण दोन भाष्ये रचिली आहेत असा पुसटसाही उल्लेख आपल्या लिखाणात कुठेही केलेला नाही ऋग्वेदासारख्या ग्रंथावर एखाद्याने दोन भाष्ये लिहिली असतील हेही बुद्धीला सहज पटण्यासारखे नाही. म्हणून पहिलाच पर्याय अधिक स्वीकारार्ह वाटतो. म्हणजेच, देवराजाने माधवाची म्हणून दिलेल्या उदाहरणांपैकी काही वेङ्कटमाधवाच्या 'ऋगर्थदीपिके'तून घेतली आहेत, तर काही दुसऱ्या एका माधवाच्या ऋग्वेदभाष्यातून घेतली असावीत. या दुसऱ्या माधवाचे हे भाष्य ऋग्वेदाच्या पहिल्या अष्टकापुरतेच उपलब्ध झालेले असून ते अड्यार लायब्ररीने "ऋग्वेदव्याख्या माधवकृता" या नावाने दोन भागांत, १९३९ व १९४७ या वर्षी, प्रसिद्ध केले आहे.[१८] वेङ्कटमाधवाची "ऋगर्थदीपिका" ही काटेकोर अर्थाने 'भाष्य' आहे असे म्हणता येणार नाही. ती एक 'टीका' आहे. विशेषतः ऋग्वेदातील काही क्लिष्ट भागांचे शास्त्रीय विवरण करण्याची या टीकाकाराची प्रवृत्ती दिसून येते.

"ऋग्वेदव्याख्या"कार माधव हा "अनुक्रमणी"-कार माधवच असावा असे मत पुढे मांडण्यात आले आहे. हे मत जर बरोबर असेल तर हा माधव स्कन्दस्वामीच्याही पूर्वीचा--म्हणजेच ज्ञात ऋग्वेदभाष्यकारांतील सर्वांत ज्येष्ठ--होता असे म्हणावयास पाहिजे. वेदार्थज्ञानाच्या दृष्टीने माधवाच्या "ऋग्वेदव्याख्ये"त आपणास काही नवे मिळते असे म्हणता येत नाही. आपण केलेल्या अर्थाच्या पुष्ट्यर्थ माधवाने वेदवाङ्मयातील निरनिराळ्या ठिकाणचे उतारे दिलेले आहेत. अनेक प्रसंगी त्याने एकापेक्षा अधिक अर्थ दिले आहेत. व्याकरण आणि स्वर या दृष्टींनी लक्षणीय असलेली ऋग्वेदाची वैशिष्ट्ये त्याने आपल्या "व्याख्ये"त साक्षेपाने टिपली आहेत. गलितांविषयीचे त्याचे विवेचनही लक्षात घेण्यासारखे आहे.

भट्ट गोविन्दाने आपल्या "श्रुतिविकास" नावाच्या ऋग्वेदभाष्याचे वर्णन 'चतुःषष्टिविवरण' असे केले आहे. यावरून त्याने ऋग्वेदाच्या सर्व-म्हणजे ६४-अध्यायांवर भाष्य लिहिले होते असे दिसून येते. आजमितीला मात्र हे भाष्य फक्त शेवटच्या आठ अध्यायांपुरतेच उपलब्ध झाले आहे. या संदर्भात लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे गोविन्दाने मण्डल किंवा अष्टक यांचा उल्लेख न करता केवळ अध्यायांचाच उल्लेख केलेला आहे. "श्रुतिविकासा"च्या पुष्पिकेत गोविन्दाने त्या ग्रंथाच्या लेखनसमाप्तीचा काल संवत १३६७ (इ. स. १३११) हा दिला आहे.[१९] १५ जानेवारी १८५५ रोजी माक्स म्यूलरला लिहिलेल्या आपल्या पत्रात फिट्झ एडवर्ड हॉल याने मुद्गलाच्या ऋग्भाष्याचा उल्लेख केला आहे. आजपर्यंत या ग्रंथाच्या फक्त तीन हस्तलिखितांचा शोध लागलेला आहे; आणि त्या हस्तलिखितांतून मुद्गलाच्या भाष्याचा काही भागच उपलब्ध झाला आहे. हॉल आणि माक्स म्यूलर यांच्या म्हणण्याप्रमाणे मुद्गलाचे भाष्य म्हणजे सायणभाष्याची सारवत् सक्षिप्त आवृत्ती आहे. विशेषेकरून, सायणभाष्यातील व्याकरणविषयक विवेचनाचा भाग मुद्गलाने कटाक्षाने गाळून टाकला आहे. मुद्गलाचा काल इ. स. पंधराव्या शतकाच्या प्रारंभाच्या सुमाराचा असावा असा तर्क करता येतो.

ऋग्वेदभाष्यकारांचा तिसरा वर्ग म्हणजे ज्यांनी काही विशिष्ट ऋग्मन्त्रांवरच भाष्य लिहिले आहे अशा भाष्यकारांचा. हरदत्त (इ. स. नववे शतक) हा मुख्यतः सूत्रव्याख्याकार म्हणून प्रसिद्ध आहे. पण त्याने "आश्वलायनमन्त्रपाठभाष्य" हा ग्रंथही लिहिला आहे.[२०] "निघण्टुभाष्य"कार देवराजाने हरदत्ताचा उल्लेख केला आहे. निरनिराळ्या संहितांतील निवडक मन्त्रांवर भाष्ये लिहिण्याची एक परंपरा इ. स. बाराव्या शतकापासून बंगालमध्ये सुप्रतिष्ठित होऊ लागली होती. अर्थात, काटेकोर अर्थाने या परंपरेतील भाष्यकारांना ऋग्वेदीय मन्त्रांचे भाष्यकार असे संबोधता येणार

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

नाही. गुणविष्णूचे (इ. स. बाराव्या शतकाच्या प्रारंभापूर्वी काही वर्षे) "छान्दोग्यमन्त्रभाष्य" हा त्या परंपरेतील मूर्धन्य ग्रंथ म्हणून मानावयास हवा. सामवेदी ब्राह्मणांच्या गृह्यकर्मांत सामान्यपणे वापरल्या जाणाऱ्या वैदिक मन्त्रांवरचे हे भाष्य आहे. यांपैकी बरेच मन्त्र सामवेदीय "मन्त्रब्राह्मणा"तील आहेत.[२१] "छान्दोग्यमन्त्रभाष्या"च्या सहाव्या खंडाच्या शेवटी गुणविष्णूने प्रत्येक वेदाच्या पहिल्या मन्त्रावरील आपले भाष्य दिले आहे.[२२] 'अग्निमीळे पुरोहितं...' या ऋग्वेदाच्या प्रथम मन्त्रासंबंधी तो लिहितो की, या मन्त्राचा विनियोग ब्रह्मयज्ञात करावयाचा असतो. हलायुध हा या परंपरेतील दुसरा भाष्यकार. तो बंगालचा राजा लक्ष्मणसेन (इ. स. ११७१–१२०१) याचा धर्माध्यक्ष होता. हलायुधाने अनेक ग्रंथ लिहिले आहेत. आपल्या "ब्राह्मणसर्वस्व" या ग्रंथात त्याने काण्वशुक्लयजुर्वेदी ब्राह्मणांच्या गृह्यकर्मांतील वैदिक मन्त्रांचे विवरण केले आहे. यजुर्वेदावरील भाष्ये फार थोडी आहेत, आणि उवटाचे भाष्य त्या वेदाच्या आकलनासाठी अपर्याप्त आहे असे त्याने म्हटले आहे. हलायुधाने आपल्या ग्रंथात गुणविष्णूचा उल्लेख केला आहे पंजाबात होऊन गेलेल्या शत्रुघ्नाचा (इ. स. १५२८) याच ठिकाणी निर्देश करणे योग्य होईल. कारण त्याने आपली "मन्त्रार्थदीपिका" उवट, गुणविष्णू आणि हलायुध– विशेषतः हलायुध– यांच्या भाष्यांवर मुख्यतः आधारली आहे. गुणविष्णूच्या पठडीतलाच आणखी एक भाष्यकार म्हणजे रामनाथ विद्यावाचस्पति (इ. स. १७ वे शतक). आपल्या "साममन्त्रव्याख्याना"त रामनाथाने, गुणविष्णूप्रमाणे, सामवेदी ब्राह्मणांच्या गृह्यकर्मांत उपयोजिल्या जाणाऱ्या वैदिक मन्त्रांवर भाष्य केले आहे.

आनन्दतीर्थ ऊर्फ मध्वाचार्य (इ. स. ११९८–१२७८) यांनी ऋग्वेदातील पहिल्या चाळीस सूक्तांवर भाष्य लिहिले आहे. ते श्लोकबद्ध असून उघडउघड वैष्णवसंप्रदायप्रवर्तक आहे. विष्णूच्या– म्हणजेच, पुरुषसूक्तोक्त पुरुषनारायणाच्या– संकल्पनेच्या द्वारा ऋग्वेदाचा एकेश्वरवाद सिद्ध झाला आहे असे मध्वाचार्यांचे मत आहे. मध्वाचार्यांच्या भाष्यावर काही ठिकाणी वेङ्कटमाधवाच्या भाष्याचा प्रभाव पडल्यासारखा दिसतो. आज अनुपलब्ध असलेल्या, "वर्कश्रुति", "तुरश्रुति", "पिङ्गश्रुति" यांसारख्या, काही ग्रंथांचा मध्वभाष्यात उल्लेख आलेला आहे. मध्वभाष्यावर जयतीर्थाने (इ.स. १३०४) टीका लिहिली आहे. "सर्वदर्शनसंग्रहा"त उल्लेखिलेली "आनन्दतीर्थभाष्यव्याख्या" तीच असावी. जयतीर्थ म्हणतो की, मध्वाचार्यांच्या मतानुसार ऋग्वेदाचा अर्थ तीन प्रकारांनी करावयास पाहिजे : पहिला, अग्न्यादि देवतांच्या संदर्भात; दुसरा, त्या देवतांच्या अंतर्गत असलेल्या ईश्वराच्या– म्हणजेच, विष्णूच्या– संदर्भात; आणि तिसरा, शुद्ध अध्यात्मपर. मध्वाचार्यांचा सगळा भर मात्र दुसऱ्या प्रकारच्या अर्थावरच आहे. जयतीर्थाच्या "व्याख्ये"वर नरसिंहाने (इ. स. १६६२) आपली "विवृति" आणि नारायणाने आपली "भावरत्नप्रकाशिका" लिहिली आहे. माध्वसंप्रदायातील प्रसिद्ध विद्वान राघवेन्द्र यति यानेही मध्वभाष्यावर "मन्त्रार्थमञ्जरी नावाची टीका लिहिली आहे.

माक्स म्यूलरने आपल्या A History of Ancient Sanskrit Literature या ग्रंथात आत्मानंद या ऋग्वेदभाष्यकाराचा प्रथम उल्लेख केला आहे. आत्मानन्द आपल्या भाष्यात भास्कराचा (इ. स. १२ वे शतक) नामनिर्देश करतो पण सायणाचा (१४ वे शतक) करीत नाही यावरून त्याचा काल इ. स. १३ वे शतक हा असावा असे अनुमान करता येते. आत्मानन्दाने लिहिलेले फक्त 'अस्य वामीय' सूक्तावरील (ऋग्वेद १.१६४) भाष्यच आज उपलब्ध आहे.[२३] आपल्या भाष्याच्या शेवटी आत्मानन्द म्हणतो : स्कन्दादिकांची भाष्ये 'अधियज्ञविषय' आहेत; 'निरुक्त' 'अधिदैवतविषय' आहे; परंतु माझे हे भाष्य 'अध्यात्मविषय' आहे. माझ्या भाष्याचे मूळ "विष्णुधर्मोत्तरपुराण" हे आहे. आत्मानन्दाच्या 'अस्य वामीय' सूक्तावरील भाष्यावरून तो शांकरमतानुयायी अद्वैतवादी असावा असे दिसून येते.

वेदभाष्यकार म्हणून रावणाचे नाव परंपरेने माहीत झाले होते. परंतु दैवज्ञ सूर्यपण्डिताने (जन्म इ. स. १५०७) आपल्या "परमार्थप्रपा" या भगवद्गीतेवरील टीकेत रावणाचे तेरा (चौदा ?) ऋग्मन्त्रांवरील भाष्य उद्धृत केले आहे त्यावरून त्याच्या भाष्यरचनेचा प्रत्यक्ष परिचय होतो.[२४] मागे उल्लेखिलेल्या १५·१·१८५५ च्या माक्स म्यूलरला लिहिलेल्या आपल्या पत्रात हॉलने मुद्‌गलाच्या भाष्याबरोबर रावणाच्या भाष्याकडेही त्याचे लक्ष वेधले होते. रावणाने ऋग्वेदाचा अर्थ अध्यात्मपर आणि अद्वैतवादी असा लावला आहे.[२५] रावणाचा काल इ. स. १५ व्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शतकाचा पूर्वार्ध हा असावा.[२६] चतुर्वेदस्वामी (लेखन-कर्तृत्वाचा काल इ. स. १४७७–१५०७) हा सूर्य-पण्डिताचा आध्यात्मिक गुरू. सूर्यपण्डिताने आपल्या "परमार्थप्रपे"त चतुर्वेदस्वामीचे ऋग्वेद १०.११३.४ या एकाच मंत्रावरील भाष्य दिले आहे. त्यावरील कृष्णसंप्रदायाचा छाप स्पष्टपणे दिसून येतो.[२७]

"ऋगर्थसार" या ग्रंथात दिनकरभट्टाने (लेखन-कर्तृत्वाचा काल इ. स. १५७५–१६४०) केलेली २०७ ऋग्मन्त्रांवरील टीका समाविष्ट झालेली आहे.[२८] हे ऋग्मन्त्र 'ऋग्वेदसारभूत' आहेत असे दिनकराने आपल्या प्रारंभिक श्लोकात म्हटले आहे. पण वस्तुत:, या मन्त्रांच्या निवडीमागे एखादे विशिष्ट विचारसूत्र किंवा त्यांच्या मांडणीत एखादी तर्कसंगती आहे असे मुळीच दिसून येत नाही. दिनकराने सामान्यपणे सायणाच्या ऋग्वेदभाष्याचेच अनुसरण केले आहे. पण काही ठिकाणी त्याने स्वतंत्रपणे सुचविलेले अर्थ व्याकरणदृष्टचा सदोष आणि आशयदृष्टचा पूर्णपणे अस्वीकार्य आहेत.[२९] दिनकराचा समकालीन असलेल्या "सिद्धान्तकौमुदी"-कार वैयाकरण भट्टोजी दीक्षिताने लिहिलेल्या "वेद-भाष्यसार" या ग्रंथाचा शोध सुमारे ४५ वर्षांपूर्वी लागला.[३०] या ग्रंथाचे एकच हस्तलिखित उपलब्ध झाले असून[३१] त्यात ऋग्वेदाच्या पहिल्या १२ वर्गांवरील—म्हणजेच पहिल्या मण्डलातील पहिल्या सहा सूक्तांवरील—भाष्य समाविष्ट झाले आहे. माधवाचार्यविरचित (म्हणजेच सायणविरचित) वेदभाष्याचे सार आपण उद्धृत करीत आहोत असे भट्टोजी आपल्या "वेदभाष्य-सारा"च्या उपोद्घातात म्हणतो. यावरून त्याने संपूर्ण ऋग्वेदभाष्याचे सार लिहिण्याचा संकल्प सोडला होता, पण तो त्याचा संकल्प सिद्धीस जाऊ शकला नाही असे अनुमान करता येते. अपेक्षेप्रमाणे, भट्टोजीचा मुख्य भर व्याकरणनिष्ठ विवेचनावर आहे. सुदर्शन-सूरि, रामाश्रम, व तिरुमलयज्वन यांनी लिहिलेली "सन्ध्यावन्दनभाष्ये" प्रसिद्ध आहेत.[३२] कृष्णाचार्य दंडवते (मृत्यू इ. स. १८९६) यांनी लिहिलेले ऋग्वेदातील 'द्वे विरूपे' (ऋग्वेद १.९५) या सूक्तावरील भाष्य अलीकडेच प्रसिद्ध करण्यात आले आहे.[३३]

ऋग्वेदभाष्यकार म्हणून ज्यांची नावे वाङ्मयाच्या किंवा परंपरेच्या द्वारा ज्ञात झाली आहेत पण ज्यांच्या भाष्यांचा काहीही अंश उपलब्ध झालेला नाही अशा चवथ्या वर्गातील भाष्यकारांत प्रथम उल्लेख करावयास पाहिजे तो देवस्वामीचा. विमलबोधाने (इ. स. १३ वे शतक) महाभारतावर "विषमश्लोकी" नावाची टीका लिहिली आहे. महाभारतांतर्गत अश्विसूक्ताचा[३४] अर्थ करताना आपण इतर साधनांबरोबर देवस्वामीच्या लिखाणाचाही उपयोग केला आहे असे विमलबोधाने म्हटले आहे. येथे विमलबोधाला देवस्वामीचे ऋग्वेद-भाष्यच[३५] अभिप्रेत असावे असे अनुमान करण्यात आले आहे. हा देवस्वामी कोण होता याविषयी निश्चित माहिती मिळत नाही. पण आश्वलायन-श्रौत-गृह्य-सूत्र-भाष्यकार देवस्वामी आणि विमलबोधाने उल्लेखिलेला देवस्वामी एकच असण्याची शक्यता नाकारता येत नाही.[३६] शंकराचार्यांच्या चार प्रसिद्ध शिष्यांपैकी हस्तामलक (करामलक, इ. स. ८ वे शतक) हा ऋग्वेदभाष्यकारही होता असे कवीन्द्राचार्यांच्या पुस्तक-भांडाराच्या सूचीपत्रावरून दिसून येते. निघण्टुभाष्य-कार देवराजाने एका संदर्भात 'अमात्य' या शब्दा-विषयीचे उवटाचे (इ. स. ११ वे शतक) मत नमूद केले आहे. पण वाजसनेयिसंहितेत 'अमात्य' हा शब्द ज्या ठिकाणी आला आहे तेथील त्या शब्दावरील उवटाच्या भाष्यात हे मत आढळून येत नाही. 'अमात्य' हा शब्द ऋग्वेदातही आला आहे. यावरून देवराजाने उद्धृत केलेले 'अमात्य' या शब्दाविषयीचे उवटाचे मत उवटाने रचिलेल्या एखाद्या ऋग्वेदभाष्यातून घेतले असावे असा तर्क करण्यात आला आहे. उवटाने 'ऋग्वेद-सर्वानुक्रमणी' व 'ऋक्प्रातिशाख्य' या ऋग्वेदीय ग्रंथांवरही भाष्य लिहिले आहे. त्यामुळे वरील तर्कास पुष्टीच मिळते. तैत्तिरीयसंहिताभाष्यकार भट्ट भास्कराने (इ. स. ११ वे शतक) लिहिलेल्या ऋग्भाष्याचा ओप्पेर्टने आपल्या हस्तलिखित सूचीच्या दुसऱ्या भागात उल्लेख केला आहे.[३७] इ. स. ११ व्या शतकाच्या शेवटी होऊन गेलेल्या माठरग्रामवासी लक्ष्मणाने वेदांवर "वेदभूषण" नावाचे भाष्य लिहिले होते असे त्याचा प्रपौत्र "भावप्रकाशन"कार शारदा-तनय याने आपल्या ग्रंथाच्या मंगल श्लोकात म्हटले आहे.[३८] "सुदर्शनमीमांसा" या आपल्या ग्रंथात धातुष्क-यज्वन् (इ. स. १२ वे शतक) याने 'त्रिवेदीभाष्यकार' असा आपला स्वत:चा परिचय करून दिला आहे. भरत-स्वामी (इ. स. १४ वे शतक) हा मुख्यत: सामवेदभाष्य-कार म्हणून प्रसिद्ध आहे. ऋग्वेद ६.१.१३ या ऋचेवरील

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या भाष्यात सायणाने असे म्हटले आहे की भरत-स्वामीने या ऋचेतील 'वसुता ते' हे दोन शब्द आहेत असे न मानता तो 'वसुताते' असा सप्त्यम्यन्त एकच शब्द आहे असे मानले आहे. सामवेदात हा शब्द आलेला नाही. म्हणून भरतस्वामीच्या आज अनुपलब्ध असलेल्या संपूर्ण किंवा आंशिक ऋग्वेदभाष्यातूनच सायणाने त्याचे उपर्युक्त म्हणणे उद्धृत केले असावे असा तर्क करता येतो.[३९] शिवाय, सामवेदभाष्यकार हा एका दृष्टीने ऋग्वेदभाष्यकारही असतोच. दक्षिण भारतातील एका संग्रहात वरदराजाच्या ऋग्वेदभाष्याचे एक हस्तलिखित उपलब्ध असल्याचे नमूद करण्यात आले आहे. पण त्यासंबंधी अधिक माहिती मिळत नाही.[४०]

पाचव्या वर्गातील म्हणजे ज्यांना आधुनिक म्हणता येईल अशा ऋग्वेदभाष्यकारांविषयी मला फारसे काही सांगावयाचे नाही. या भाष्यकारांपकी स्वामी दयानन्द सरस्वती (इ. स. १८२५–१८८४) यांचे नाव सर्व-श्रुत आहे. स्वामीजींनी ऋग्वेदभाष्य संस्कृत आणि हिंदी या दोन्ही भाषांत रचिले आहे. वेद अनादि आहेत, वेदांत लौकिक इतिहासाचा अन्तर्भाव झालेला नाही, वैदिक शब्दांचा अर्थ यौगिक पद्धतीनेच लावला पाहिजे, वेदांतील एका शब्दाचे अनेक अर्थ होऊ शकतात, इत्यादी दयानन्दभाष्याची मूलभूत गृहीतके आहेत. आपल्या "सिद्धाञ्जन" नावाच्या ऋग्वेदावरील भाष्यात पंडित कापालिशास्त्री यांनी श्रीअरविन्द यांच्या गूढ-वादी, आध्यात्मिक, आणि प्रतीकात्मक अर्थाविष्कार-पद्धतीचा व विचारसरणीचा पुरस्कार केला आहे.[४१] पंडित गणपतिमुनी यांचे "ऋग्वेदभाष्यपीठिका" आणि "आदिवेदभाष्य" हे ग्रंथही "सिद्धाञ्जना"च्या बाबतीत प्रेरक ठरले आहेत.[४२] पंडित सीतारामशास्त्री यांनी स्वतंत्र असे ऋग्वेदभाष्य लिहिलेले नाही. परंतु त्यांच्या "वेदार्थविचारः" या ग्रंथात[४३] अनेक ऋचां-वरील त्यांची टीका समाविष्ट झाली आहे. ती टीका पंडितजींच्या वेदविषयक विचारांवर चांगला प्रकाश पाडते.

ऋग्वेदभाष्यकारांचा असा स्थूल रीतीने विचार केल्यावर मुख्यतः तीन प्रश्न मनात उद्भवतात. त्यांचा येथे केवळ निर्देश करतो. पहिला प्रश्न असा की, वेदज्ञानसाधनपरंपरेचा दुसरा स्तर आणि तिसरा स्तर या दोहोत जवळजवळ ११००–१२०० वर्षांचा खण्ड का पडला असावा ? या प्रश्नाच्या उत्तराचे तीन पर्याय असू शकतात. ते असे : (१) या ११००–१२०० वर्षांच्या कालखंडात वेदार्थज्ञान संपादन करण्याची किंवा त्यासाठी आवश्यक असे साहित्य निर्माण करण्याची लोकांना फारशी निकड वा उत्सुकता वाटली नाही. किंवा (२) वेदांचे पावित्र्य जतन करण्यासाठी– त्यांचे लौकिकीकरण होऊ न देण्यासाठी– वेदार्थज्ञानप्रसाराचे प्रयत्न हेतुपूर्वक टाळण्यात आले. किंवा (३) या काल-खंडात वेदार्थज्ञानसंपादनाची केवळ मौखिक परंपरा चालू होती. त्यामुळे लिखित ग्रंथ फारसे निर्माण झाले नाहीत, व जे काही थोडे निर्माण झाले असतील ते नष्ट झाले. दुसरा प्रश्न : उपलब्ध ऋग्वेदभाष्यांच्या अभ्यासा-वरून सामान्यपणे असा ग्रह होतो की, त्या भाष्यांच्या कर्त्यांनी शब्दार्थातून भावार्थ काढला नाही तर आधी भावार्थ मनाशी निश्चित करून त्याला अनुरूप असा शब्दार्थ लावला. हे असे का झाले असावे ? आणि तिसरा प्रश्न : आधुनिक शास्त्रीय पद्धतीने ऋग्वेदार्थनिश्चिति करण्याच्या कामी ही ऋग्वेदभाष्ये कितपत उपयुक्त ठरतात ?

## संदर्भ टीपा

१. 'सायण' हे नाव 'स्वामिन्-सायि' (=ईश्वर) आणि 'अण्ण' (=वडील भाऊ) या शब्दांपासून कन्नड नामोत्पत्तिपद्धतीप्रमाणे साधित झालेले असावे असे सुचविण्यात आले आहे (*Journal of the American Oriental Society*, 94, 211–12).

२. या ठिकाणी फक्त बुक्काचाच उल्लेख केला गेला असला तरी सायणाने आपल्या "सुभाषित-सुधानिधि" या ग्रंथात कम्पराजाचा, "प्रायश्चित्तसुधानिधि" इत्यादी ग्रंथांत द्वितीय संगमाचा, आणि शतपथादी ब्राह्मणांवरील भाष्यांत द्वितीय हरिहर याचा आपला स्वामी म्हणून उल्लेख केलेला आहे. हे तिघेही विजयानगरचे सम्राट होते.

३. माधवाने रचिलेल्या पराशरस्मृतीच्या टीकेत त्याने श्रीमती ही आपली आई, मायण हा पिता, सायण व भोगनाथ हे दोघे भाऊ, सूत्र बौधायन, याजुष शाखा, भारद्वाज गोत्र, अशी आपली माहिती दिली आहे. माधवाचार्य म्हणजेच विद्यारण्यस्वामी या समजुतीबद्दल अनेक विद्वानांनी शंका व्यक्त केली आहे.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

४. इतर वैदिक ग्रंथांवरील सायणाच्या भाष्यासंबंधीही असेच म्हणता येईल.

५. सायणभाष्यात उपनिषदांतील उद्धरणे दिलेली नाहीत.

६. या मताचे पुरस्कर्ते विल्सन, पिशल, गेल्डनर वगैरे.

७. या मताचा मुख्य प्रवर्तक रूडोल्फ रोट.

८. भर्तृध्रुव म्हणजेच वलभीचा राजा ध्रुवसेन (इ. स. ६०८–६०९) असावा असे सुचविले गेले आहे (*Proceedings of the All-India Oriental Conference, Lahore,* 1928, p. 258). पण हे शक्य वाटत नाही.

९. उपलब्ध हस्तलिखितांत स्कन्दस्वामीचे संपूर्ण प्रथमाष्टकावरील आणि दुसऱ्या, तिसऱ्या, चवथ्या व पाचव्या अष्टकांच्या काही भागांवरील भाष्य मिळू शकते. इतरही काही भाष्यांश त्यात आलेला आहे. स्कन्दस्वामीचे भाष्य त्रिवेंद्रम, मद्रास व कलकत्ता या ठिकाणी प्रसिद्ध झाले आहे.

१०. ते निरुक्तभाष्य महेश्वराने लिहिले असावे असे एक मत पुढे मांडण्यात आले आहे.

११. ऋग्वेदीय वाङ्मयाशी संबद्ध असलेल्या "आश्वलायनश्रौतवृत्ति", "गोभिलगृह्यवृत्ति", "आश्वलायनगृह्यविवरण" आणि "शाङ्खायनगृह्यभाष्य" या चार ग्रंथांचे कर्ते म्हणून चार वेगवेगळे नारायण प्रसिद्ध आहेत. पण कालदृष्टया ते पुष्कळच नंतरचे आहेत.

१२ उद्गीथाचे भाष्य अनेक वर्षांपूर्वी (इ. स. १९३९ साली) लाहोर येथे प्रथम प्रसिद्ध झाले.

१३. वेङ्कटमाधवाचे भाष्य त्रिवेंद्रम, लाहोर, कलकत्ता, मद्रास इत्यादी ठिकाणी आता प्रसिद्ध झाले आहे.

१४. माधव नावाचे अनेक भाष्यकार ज्ञात आहेत. हा माधव वेङ्कटाचार्याचा पुत्र म्हणून वेङ्कटमाधव या नावाने ओळखला जातो.

१५. 'वेदभाष्यकार' या विषयात 'माधव' या नावाने एक मोठीच समस्या निर्माण केलेली आहे. "अनुक्रमणी"कार व कदाचित "ऋग्वेदव्याख्या"कार माधव, "सामविवरण"कार माधव, "ऋगर्थदीपिका"कार वेङ्कटाचार्यसुत माधव, "वेदार्थप्रकाश"कार सायण-माधव असे माधव नावाचे अनेक प्रख्यात भाष्यकार होऊन गेले आहेत.

१६. एखाद्याने एकाच ग्रंथावर दोन भाष्ये लिहिली असल्यास त्या भाष्यांना 'प्रथम' आणि 'द्वितीय' असे न म्हणता सामान्यपणे 'लघु' आणि 'बृहत्' असे म्हणण्याचा प्रघात आहे.

१७. 'प्रथमभाष्यम्' या शब्दाने देवराजाला काय अभिप्रेत होते, ते कळत नाही. कदाचित त्याला माधवाचे प्रथमोल्लिखित भाष्य किंवा प्रथमोल्लिखित माधवाचे भाष्य असे म्हणावयाचे असेल.

१८. पण हा प्रश्न अशा रीतीने संपूर्णतया समाधानकारकपणे सुटला आहे असे म्हणता येत नाही. कारण येथे एक घोटाळा निर्माण झाला आहे. तो म्हणजे "ऋग्वेदव्याख्या"कार माधवानेही आपण गोमान् या गावचे रहिवासी असल्याचे सांगितले आहे. वेङ्कटमाधवही गोमान् गावचा रहिवासी होता.

१९. वेङ्कटमाधवाच्या एका मुलाचे नाव गोविन्द असे होते. पण तो गोविन्द आणि "श्रुतिविकास"-कार गोविन्द एकच व्यक्ती असणे कालदृष्टया अशक्य आहे.

२०. या ग्रंथाची हस्तलिखिते म्हैसूर, मद्रास, त्रिवेंद्रम्, इत्यादी ठिकाणी उपलब्ध आहेत.

२१. सामवेदीय मन्त्रांवरील भाष्य म्हणजे एका अर्थी ऋग्वेदीय मन्त्रांवरील भाष्यच होय. गुणविष्णूने "मन्त्रब्राह्मणा"वरही भाष्य लिहिले आहे.

२२. या संदर्भात एक लक्षणीय गोष्ट ही की, अथर्ववेदातील पहिला मन्त्र म्हणून गुणविष्णूने पैप्पलाद शाखेच्या अथर्ववेदसंहितेतील पहिल्या मन्त्रावर – म्हणजे 'शं नो देवीरभिष्टये' या मन्त्रावर – भाष्य केले आहे. शौनकशाखेच्या अथर्ववेदसंहितेतील प्रथम मन्त्र 'ये त्रिषप्ताः' हा आहे. ब्रह्मयज्ञात 'शं नो देवीरभिष्टये' हाच मन्त्र उपयोजिला जातो.

२३. या भाष्याची चार हस्तलिखिते ज्ञात आहेत. कुन्हन राजा यांनी सायण व आत्मानन्द यांच्या भाष्यांसहित 'अस्य वामीय' सूक्ताचे संपादन केले आहे (मद्रास, १९५६). त्यापूर्वी प्रेमनिधिशास्त्री यांनी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लाहोर येथे आत्मानन्दभाष्य प्रसिद्ध केले आहे ( पाहा : कपिलदेव शास्त्री, "स्वामी आत्मानन्दकृत ऋग्वेद-भाष्य : एक परिचयात्मक विश्लेषण ", *Kurukshetra University Research Journal*, Arts and Humanities, 18-19, 235–242 ). आत्मानन्दाने संपूर्ण ऋग्वेदावर भाष्य लिहिले होते असे म्हणण्यास काही पुरावा नाही.

२४. सूर्यपण्डिताने भास्कराचार्यांच्या "लीलावती" व "बीजगणित" या ग्रंथांवरही टीका लिहिल्या आहेत. त्याने "सामभाष्य" लिहिले होते अशीही एक परंपरा आहे.

२५. भगवद्गीता ११.३३ वरील आपल्या टीकेत सूर्यपण्डित म्हणतो : 'सायणभाष्यकारैराधिदैविकाभिप्रायेण बाह्यसंग्रामविषयो दर्शितः। रावणभाष्ये तु अध्यात्मरीत्याभ्यन्तरसंग्रामविषयो दर्शितः।'

२६. रावणाने संपूर्ण ऋग्वेदावर भाष्य लिहिले होते असे गृहीत धरण्यास पुरावा नाही. मात्र त्याने ऋग्वेदाचा पदपाठ रचिला होता असा एक उल्लेख मिळतो.

२७. चतुर्वेदस्वामीने या ऋचेतील 'अवृश्चदद्रिम्' याचा अर्थ 'गोवर्धनमुद्दधार' असा केला आहे, आणि तेथे उल्लेखिलेले 'रण' म्हणजे 'कुरुपाण्डवसंग्राम' होय असे म्हटले आहे.

२८. हा ग्रंथ (भाग पहिला) हैदराबाद येथील उस्मानिया विद्यापीठाच्या संस्कृत अकॅडेमीने १९५९ साली प्रसिद्ध केला आहे. "कर्मविपाकसार", "प्रायश्चित्तसार", "शान्तिसार" इत्यादी दिनकराने रचिलेले अन्य ग्रंथ आहेत.

२९. उदाहरणार्थ, दिनकराने एका मन्त्राचा अर्थ रामचरितपर लावला आहे.

३०. *Adyar Library Bulletin* 5 (4), *176-80*.

३१. हे हस्तलिखित हल्ली राजापूर येथील संस्कृत पाठशाळेत आहे.

३२. सायणाने सुदर्शनसूरीच्या भाष्याचा उपयोग केला असावा असे एक मत पुढे मांडण्यात आले आहे. पण असे असणे शक्य दिसत नाही.

३३. भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे, १९६८.

३४. महाभारत, १.३.६०–७०.

३५. महाभारतातील अश्विसूक्त ऋग्वेदातून उद्धृत केलेले नाही. पण त्यातील शब्द आणि आशय ऋग्वेदीय अश्विसूक्तातील शब्द आणि आशय यांच्याशी मिळतेजुळते आहेत. त्या अश्विसूक्तास उद्देशून महाभारतात 'वाग्भिः ऋग्भिः' असे शब्द वापरलेले आहेत.

३६. देवस्वामी हा हरिस्वामीचा पुत्र होता अशी एक परंपरा "कथासरित्सागरा"त उल्लेखिलेली आहे. हा हरिस्वामी म्हणजे शतपथब्राह्मणभाष्यकार हरिस्वामी (इ. स. ७ वे शतक) असू शकेल काय ?

३७. G. Oppert, *Lists of Sanskrit Manuscripts in Private Libraries of Southern India*, Vol. II, No. 511. ऋग्वेद ६.१.१३ वरील आपल्या भाष्यात सायणाने भट्टभास्कर मिश्राचाही उल्लेख केला आहे. भास्कराने ऐतरेय ब्राह्मणावरही भाष्य लिहिले आहे.

३८. 'वेदानां भाष्यम्' या शब्दप्रयोगाने ( भावप्रकाशन १.७ ) ऋग्वेद आणि इतर वेद सूचित होतात.

३९. आपल्या सामवेदभाष्यात भरतस्वामीने ऐतरेयब्राह्मणाचा अनेकदा उल्लेख केला आहे.

४० *Oppert, Op. cit.*, Vol. I, No. 1407. हा वरदराज आणि भट्टोजीचा शिष्य वरदराज ( इ. स. १६००–१६५० ) एकच व्यक्ती असणे शक्य आहे.

४१. पंडित कापालिशास्त्रींचे ऋग्वेदभाष्य पूर्ण झाल्याचे माझ्या ऐकिवात नाही.

४२. इन्द्र हाच एक एव वैदिक देव आहे, महाभारत-युद्ध वैदिक कालातच झाले, इत्यादी मते पंडित गणपतिमुनींनी पुढे मांडली आहेत.

४३. संस्कृत कॉलेज, कलकत्ता, १९६१.

⊙ ⊙ ⊙



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# महाकवी दान्ते : द डिव्हाइन कॉमेडी*

विश्वास कानडे

– १ –

इटालिअन महाकवी दान्तेच्या 'डिव्हाइन कॉमेडी' या महाकाव्यावर निबंध वाचण्याचे जेव्हा मी कबूल केले त्या वेळी मी माझ्यावर कोणते संकट ओढवून घेतो आहे, याची मला कल्पना नव्हती. महाकाव्याच्या एका भाबडया आकर्षणापोटी मी हे मान्य केले असावे. शिवाय, इंग्रजीत म्हणतात त्याप्रमाणे Fools rush in where angels fear to tread या न्यायानेही ते घडले असले पाहिजे. कारण दान्तेवर झालेले एकूण काम पाहिले म्हणजे अक्षरशः डोळे फाटायची वेळ येते, इतके ते प्रचंड आहे. त्यातल्या प्रत्येक कँटोवर, नव्हे त्यातल्या एकेका कडव्यावर स्वतंत्र व्याख्यान देता येऊ शकते. अनेकांनी ते केलेलेही आहे. अशा परिस्थितीत आपण हे काम उगीचच अंगावर घेतले असे मला सारखे वाटू लागले–अजूनही वाटते आहे. ते कसेही असले, तरी एकदा ते मान्य केल्यानंतर त्यातून सुटका नव्हती. नाही म्हणायला त्यातही मला एक आधार सापडला. तो म्हणजे ह्या निबंधाचा हेतू 'डिव्हाइन कॉमेडी'वर भाष्य करण्याचा नसून फक्त मराठी रसिकाला त्या महाकाव्याचा परिचय करून देणे एवढाच मर्यादित स्वरूपाचा आहे. अर्थात ते करणेदेखील किती कठीण आहे, याची जाणीव मला अभ्यासाला सुरवात करताच झाली आणि आपल्यालाही ती थोडयाच वेळात होईल. कारण जिथे या निबंधाने माझेच समाधान झालेले नाही तिथे मी आपले समाधान काय करणार ? तरीदेखील आपण ह्यातल्या उणिवांकडे उदार मनाने काणाडोळा कराल या आशेवर मी तो आपल्यासमोर सादर करणार आहे.

सुंदर काव्याबद्दल सर्वसाधारणपणे असे म्हणता येते की, त्याच्या आस्वादासाठी आपल्याला त्या लेखकाबद्दल किंवा ज्या काळात ते लिहिले गेले त्याबद्दल फारशी माहिती असण्याची आवश्यकता नाही. ते प्रामुख्याने स्थलकालातीत असते. पुष्कळदा ह्या अपुऱ्या माहितीमुळे आपल्या आस्वादात विक्षेपही निर्माण होऊ शकतो. अर्थात एकदा काव्याने आपल्याला भुरळ घातली की मग इतर व्यक्तिविषयक किंवा ऐतिहासिक तपशील ह्या स्वागतार्ह वाटू लागतो. त्यामुळे आपला आस्वाद अधिक व्यापक आणि आनंददायक होऊ लागतो. याउलट, असल्या तपशिलांच्या अध्ययनाखेरीज जर काव्य–विशेषतः महाकाव्य–समजणार नसेल, तर ते वाचण्याचा प्रयास करावासा वाटत नाही.

परंतु परभाषेतील वाङ्मयासंबंधी अशा प्रकारे विचार करणे योग्य होणार नाही. तिथे एका विशिष्ट प्रकारची पूर्वतयारी आवश्यकच मानायला हवी. त्याकरिता अर्थातच विद्वत्तेची आवश्यकतान सते, कारण ही तयारी प्रामुख्याने माहितीच्या स्वरूपाची असते. एवढी तयारी गृहीत धरूनही अनेकदा एखाद्या काव्याचा आस्वाद आपल्याला घेता येऊ शकत नाही. त्यासाठी त्या लेखकाचे चरित्र किंवा तत्त्वज्ञान किंवा त्या काळची सामाजिक परिस्थिती इ. गोष्टींचा आधी परिचय करून घ्यावा लागतो. आपल्याला असे वाटेल की, दान्तेची 'डिव्हाइन कॉमेडी' हे या दुसऱ्या प्रकारचे काव्य असावे. तसे असते तर त्या महाकाव्याच्या श्रेष्ठत्वाला बाधा आली असती. भाषांतर ज्या भाषेत झालेले आहे त्या भाषेचा आपला घनिष्ठ परिचय असला, आपण ती आत्मसात केलेली असली आणि अनुवादक हा समर्थ भाषांतरकार असला, तर 'डिव्हाइन कॉमेडी'च्या श्रेष्ठत्वाची ओळख कुठल्याही प्रकारच्या अवांतर माहितीशिवाय आपल्याला पटू शकते. एखाद्या काव्याच्या बाबतीत एकदा हे पाहताक्षणीचे प्रेम निर्माण झाले, की

---

* मुंबई विश्वविद्यालयाच्या मराठी व तौलनिक साहित्याभ्यास विभागाच्या संयुक्त विद्यमाने दि. १४ व १५ डिसेंबर, १९८८ रोजी आयोजित केलेल्या 'विश्वसाहित्याचे मानकरी' या विषयावरच्या चर्चासत्रांत वाचलेला निबंध.

अनुक्रमणिका



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पुढचा सहप्रवास हा कितीही कष्टमय असला, तरी त्याचे काही वाटत नाही. दान्तेच्या 'कॉमेडी'चा माझा अनुभव हा असा आहे.

तुलनेसाठी म्हणून नाही ( कारण महाकाव्यामध्ये श्रेष्ठकनिष्ठ या स्वरूपाची तुलना करणे वेडेपणाचेच ठरेल ), तर अंतर स्पष्ट करण्यासाठी आणि थोडी पूर्वसूचना देण्यासाठीही इथे रामायण व महाभारताचा उल्लेख योग्य ठरेल. रामायण, महाभारत ही महाकाव्ये खऱ्याखुऱ्या अर्थाने स्थलकालनिरपेक्ष वाटतात. त्यांतल्या नाटचाचे आणि काव्याचे मानवी परिमाण इतके सर्वसमावेशक आहे, की त्यांतल्या तात्कालिक तपशिलांचे महत्त्वच उरत नाही. म्हणून त्यांची सार्वत्रिकता, ही जगन्मान्य ठरली आहे. 'पॅरडाइझ लॉस्ट' किंवा 'डिव्हाइन कॉमेडी' बद्दल आपल्याला असे म्हणता येणार नाही. त्यांच्यातील मानवी परिमाणाचा आपल्याला तत्काल स्पर्श होत असला, तरी त्यांच्यातील सार्वत्रिकता आणि त्यांच्या मुळाशी असलेल्या महानाटचाचा उलगडा आपल्याला त्यांच्या काळाचे सर्व संदर्भ नीट समजावून घेऊनच होऊ शकतो. 'कॉमेडी'च्या बाबतीत ह्या गोष्टीला एक वेगळे आणि मोठे महत्त्व आहे; कारण त्यात दान्ते ज्या (समकालीन आणि ऐतिहासिक-पारंपरिक ) व्यक्तींचा समावेश करतो त्यांना त्यांच्या ऐतिहासिकतेखेरीज काव्यगत असे प्रतीकात्मक महत्त्वही असते. याचे स्पष्टीकरण 'कॉमेडी'च्या इतर गुणवैशिष्टचांबरोबर पुढे ओघाने येईलच.

'कॉमेडी'च्या महायात्रेचा यात्रिक माणूस आहे, त्याचा प्रवास हा स्थलकालमर्यादांपलीकडे अनंत योजनांचा आहे आणि त्याचे लक्ष्य चिरआनंद-निधान असा तेजोमय, अक्षय बिंदू आहे. पण हा माणूस एक विशिष्ट माणूस आहे– दान्ते. हा काळ एक विशिष्ट काळ आहे–युरोपमधील चवदावे शतक आणि हे स्थळही एक विशिष्ट स्थळ आहे– इटालीतील फ्लॉरेन्स हे शहर. ह्या महाकाव्यातील पृथ्वी, नरक आणि स्वर्ग ही सर्व याच एका ठिकाणी सामावलेली आहेत. आणि म्हणूनही आपल्याला चवदाव्या शतकातल्या युरोपात– विशेषतः इटालीत–शिरायला हवे. तत्कालीन सामाजिक परिस्थिती, राजकारण, धर्मकारण आणि त्यामागच्या तात्त्विक धारणा यांची अल्पशी ओळख करून घ्यायला हवी.

दान्ते ॲलिघिअरीचा जन्म इ. स. १२६५ साली इटालीतील फ्लॉरेन्स या शहरी झाला.

तेराव्या शतकातील इटाली हा राजकीय दृष्टचा अतिशय अस्थिरतेने ग्रासलेला देश होता. पाचव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंतच्या मध्ययुगीन युरोपात प्रचंड उलथापालथी झाल्या. ( ह्याच युगाला पूर्वी अंधारयुग म्हणूनही संबोधत असत. ) रोमन साम्राज्याच्या प्रभुसत्तेखाली युरोपची एकता बरीच शतके अभंग राहिली असली, तरी (जर्मन) हल्लेखोर टोळचांचा रोमला सतत उपसर्ग पोहचत राहिला आणि विध्वंस व रक्तपात ह्यांमुळे राजकीय स्थैर्य नष्टप्राय झाल्यासारखे होते. आठव्या शतकात ज्यांना "पेपल स्टेट्स" (पोपने नियंत्रित केलेली राज्ये ) म्हणतात त्यांचा उदय झाला. ह्याबरोबरच चर्च हे केवळ अधिभौतिक सत्तेचे केंद्र न राहता भौतिक ( राजकीय ) सत्तेचेही केंद्र बनले. पोपच्या पदात आता धर्मगुरू आणि सम्राट अशी दोन्ही पदे एकवटली. रोमला पुनः भरभराटीचे दिवस आले. मध्ययुगीन विध्वंसक उलाढालींमध्ये संस्कृती आणि सभ्यता ह्यांना जिवंत ठेवण्याच्या आणि जोपासण्याच्या कार्यात फक्त चर्चचेच योगदान होते.

परंतु बाराव्या शतकात पोपच्या ह्या अनिर्बंध सत्तेला आव्हान मिळू लागले. स्वायत्ततेची मागणी आणि आपापसांतील कलह ह्या दोन विघटनकारी शक्तींनी पोपची सत्ता खिळखिळी करून टाकली. तेराव्या शतकाच्या आरंभी इटालीचे राजकीय ऐक्य जवळजवळ लोपल्यासारखेच झाले. इटाली हे स्वतंत्र आणि स्वायत्त अशा लहानसहान नगर-राज्यांचे एक कडबोळे झाले. केंद्रीय सत्ता म्हणून शिल्लक राहिली नाही. त्यांना एकत्र गुंफणारे सूत्र म्हणजे त्या सर्वांचे आध्यात्मिक केंद्र, रोमचे चर्च हे होते. रोमन साम्राज्याशी फक्त नावापुरते नाते होते. प्राचीन रोमन कायदा परंपरेने अजूनही ह्या राज्यांमध्ये चालत होता. एक राज्य व दुसरे राज्य यांच्यातील भांडणे नेहमीचीच होती. आणि परस्परांतील सत्ताकलहामुळे कधी याच्याशी तर कधी त्याच्याशी युती करणे अपरिहार्य होऊ लागले होते. संपूर्ण देशभर जागोजागी अशा प्रकारची सत्तास्पर्धा बोकाळली होती. त्याचबरोबर तात्त्विक आणि धोरणविषयक मतांतरांना तीव्र स्वरूप प्राप्त होऊ लागले होते. धोरणासाठी आज एकाची आणि प्रदेशासाठी









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

किंवा राजकीय स्वार्थासाठी उद्या त्याच्यावरच कुरघोडी हे दृश्य नेहमीचेच झाले होते. (१२ व्या–१३ व्या शतकांतील इटालीची कल्पना आजच्या आपल्या राजकीय–सामाजिक स्थितीकडे नजर टाकली तरी नीट येऊ शकते.)

ह्या संबंधांच्या मुळाशी जो एक तात्त्विक स्वरूपाचा संघर्ष होता, त्याचे स्वरूप हे आज आपल्याला सुपरिचित असलेल्या संघर्षाचे होते. एका बाजूला जनहिताच्या कायद्याचे राज्य हवे असणारे होते, तर दुसऱ्या बाजूला सैनिकी कायद्याचे समर्थक. परंतु प्रत्यक्षात हा लढा त्या वेळच्या दोन पक्षांमधल्या लढ्याच्या स्वरूपात दिसायचा. हे दोन पक्ष होते– गेल्फस आणि घिबेलाइन्स. फार ढोबळपणे असे म्हणता येईल की, घिबेलाइन्स हा सरंजामशहांचा पक्ष होता. ते सम्राटाचे समर्थक होते आणि सम्राटाच्या पाठबळाची अपेक्षा ठेवीत होते. त्यांचा पोपच्या वाढत्या भौतिक आधिपत्याला विरोध होता. याउलट, गेल्फस हा 'जनवादी' शक्तींचा पक्ष मानावा लागेल. अर्थात याचा अर्थ मात्र असा नाही की, आजच्या अर्थाने ते समतेच्या तत्त्वाचे पुरस्कर्ते होते. त्यांना (लोकतांत्रिक) घटनाधिष्ठित राज्य हवे होते. त्यांच्यात मूळचे इटालियन लोक, अल्प उच्चपदस्थ आणि व्यापारी वर्ग यांचा भरणा होता. नागरी स्वातंत्र्याचे ते पुरस्कर्ते होते. त्यांना साम्राज्याचे जोखड उलथून फेकायचे होते आणि त्यांना या कामी पोपचे साह्य मिळावे अशी अपेक्षा होती.

इथे पुनः एकदा हे आवर्जून सांगितले पाहिजे की, गेल्फ्स आणि घिबेलाइन्स ह्यांच्यामधले हे विभाजन नेहमीच अस्थिर स्वरूपाचे असे. आजचा घिबेलाइन हा उद्या गेल्फ होणार नाही ह्याची खात्री नसे. त्याचप्रमाणे गेल्फ आणि घिबेलाइन ह्यांनी एकत्र येऊन एखादी गोष्ट करणे हेदेखील अशक्य नव्हते. एका शहरामध्ये ह्यांच्यात संघर्ष झाला, तर विजयी पक्षाने पराभूतांना हद्दपार करावे आणि पुढे ह्या हद्दपारांनी दुसऱ्या राज्यातील शक्तींचा उपयोग करून परत आपल्या शहरात सत्तेवर यावे हा प्रकार अपरिचित नव्हता. सत्तांतराच्या व संघर्षाच्या ह्या खेळाचे स्वरूपही आपल्या आजच्या आयाराम-गयारामच्या स्वरूपापेक्षा फारसे भिन्न नव्हते. प्रदेश, पक्ष आणि तात्त्विक धोरण ह्यांबरोबरच कौटुंबिक बंधने ह्यांच्यातील संघर्षाचा फायदा घेण्यासाठी युरोपमधील इतर शक्ती (फ्रान्स, जर्मनी इत्यादी) तयारच असायच्या.

परंतु राजकीय संघर्ष आणि सामाजिक अस्थिरता ह्यांबरोबरच तत्कालीन इटालीत व्यापार-उदिमाला भरभराटीचा काळ आलेला होता. पुढे येऊ घातलेल्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाची (रेनेसाँ) पदचिन्हे ह्याच काळात दिसायला सुरुवात झाली होती. व्यापाराला जोम होता आणि कुशल कारागिरांच्या नागरी संस्था (गिल्ड्स) अस्तित्वात आल्या होत्या आणि व्यापारी वर्ग हा सत्तेवर येऊ लागला होता. जुन्या अभिजात विद्यांचे पुनरुत्थान सुरू झाले होते. आणि हा नवीन सुसंस्कृत वर्ग विद्वानांना आणि धर्मोपदेशकांना मोठ्या प्रमाणात उत्तेजन देऊ लागला होता. त्याचप्रमाणे पाठशाला आणि विद्यापीठे यांची स्थापना करून शिक्षणप्रसारात सक्रियपणे सहभागी होत होता. एवढेच नव्हे, तर तत्त्वज्ञान आणि विज्ञान ह्यांच्या विकासासाठी निरनिराळ्या प्रकारची अध्यासने निर्माण करीत होता.

एकूण तत्कालीन इटालीतील नगरे म्हणजे केवळ एखाद्या देशातील एक लहानसे गाव, अशा स्वरूपाची नव्हती. ह्या सर्व नगरांचे, विशेषतः फ्लॉरेन्सचे, महत्त्व किती अनन्यसाधारण होते, याची कल्पना डोरोथी सेअर्सच्या पुढील शब्दांवरून येईल–

" In the western civilization of that day, whose centre was the Mediterranean, they were as important as the Balkan states in the larger world of today, their internal dissensions might exercise upon the European history of the time an influence comparable to that of the recent Spanish Civil War upon our own, and might involve equally wide issues. " (Hell, Introduction, p. 20).

दान्ते जन्मला ते वर्षदेखील महत्त्वपूर्ण घडामोडींचे होते. तेराव्या शतकाच्या मध्यात इटालीच्या एकीकरणाचा एक मोठा प्रयत्न झाला. तो त्या वेळच्या सिसिलीचा राजा फ्रेडरिक दुसरा (Wonder of the world) याचा. सिसिली आणि इटाली यांचे एक संयुक्त राष्ट्र निर्माण करण्याची त्याची कल्पना होती. पण पोप व त्याच्या समर्थकांनी त्याचा हा प्रयत्न

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हाणून पाडला. त्यातून निर्माण झालेल्या गेल्फ्स आणि घिबेलाइन्स यांच्यामधील संघर्षाची परिणती शेवटी १२६५ मध्ये बिनेव्हेन्तो ( Benevento ) येथील लढाईत झाली आणि शत्रूंचा बीमोड करून गेल्फ्स सत्तेवर आले.

दान्तेचे कुटुंब गेल्फ होते आणि आपण अस्सल फ्लॉरेन्टाइन आहोत याचा त्यांना अभिमान होता. दान्तेचे कुटुंब तसे सरदार-दरकदारांसारखे श्रीमंत नसले, तरी सधन होते. त्यांची थोडीफार जमीन होती, हक्काचे घर होते आणि समाजात ते सन्मानाने राहात होते. तो पाच-सहा वर्षांचा असतानाच दान्तेची आई वारली आणि त्याच्या बाराव्या वर्षी त्याचे वडीलही गेले. त्यानंतर त्याच्या सावत्र आईने दान्ते व त्याच्या भावंडांचा सांभाळ केला. नुकत्याच झालेल्या संघर्षाच्या आणि युद्धाच्या कथा दान्तेच्या कानावर त्याच्या बालपणी सतत आल्या असणार आणि त्यांचा त्याच्या मनाच्या जडणघडणीत मोठा वाटा असला पाहिजे. त्याच्या "इन्फर्नो" आणि "पुर्गटोरिओ"त याचे पडसाद आपल्याला स्पष्टपणे उमटलेले दिसतात.

दान्तेच्या जीवनाबद्दल साधार अशी माहिती फारशी उपलब्ध नाही. अनेक दंतकथा, आख्यायिका आणि त्याच्या वाङ्मयात येणारे उल्लेख यांच्या आधारानेच त्याची चरित्रकथा तयार करावी लागते. विशेषतः त्याचे जे पहिले महत्त्वाचे काव्य– व्हिटा नोव्हा– ( ' New Life ' ) त्यावरून.

या संदर्भावरून मिळणारी माहिती जरी अल्प असली, तरी दान्तेच्या 'कॉमेडी'च्या आकलनासाठी अत्यंत उपयुक्त आणि महत्त्वाची अशी आहे. त्यांतील महत्त्वाच्या घटनेचा उल्लेख करण्याआधी त्याच्या जीवनाच्या इतर तपशिलांची ओळख करून घेणे योग्य होईल.

त्या काळच्या सर्वसाधारण मुलाला मिळणारे शिक्षण दान्तेलाही मिळाले. सुरवातीपासूनच दान्तेचा ओढा बौद्धिक आणि वाङ्मयीन गोष्टींकडे असला पाहिजे. कारण नुकतीच प्रॉव्हेंकलकडून आलेली देशी भाषेतली कविता हा त्याचा आवडीचा विषय झाला होता. त्याच्या विशीतल्या कवितांवरून हे स्पष्ट दिसते. ह्याच आवडीतून त्याची त्याच्यापेक्षा वयाने थोडा मोठा असलेला तत्कालीन कवी गिदो कॅव्हलकँटी याच्याशी गाढ मैत्री झाली.

१२८९ मध्ये झालेल्या कंपाल्डिनो (Compaldino) येथील मोठ्या लढाईत दान्तेने हिरिरीने भाग घेतला. घिबेलाइन्सचा पराभव करून गेल्फ्सनी कॅप्रोना (Caprona) ताब्यात घेतले. आपल्या मित्राला लिहिलेल्या पत्रात दान्तेने असे कळविले की, सुरवातीला जरी तो भयभीत झाला होता, तरी नंतर युद्धातील चढउतारात त्याला आनंद वाटू लागला. १२९५ च्या सुमारास दान्ते राजकीय घडामोडींमध्ये रस घेऊ लागल्याचे आपल्याला दिसते. त्याच वर्षी तो गिल्डचा सदस्य झाला आणि नगरातील अधिकारपदांसाठी लागणारी पात्रता त्याने प्राप्त केली. पुढल्याच वर्षी त्याने नागरिकसभेत भाषणही केले. १२९९ मध्ये तर त्याला सान जेमिन्यानो ( San Gemignano ) या शहरी फ्लॉरेन्सचा वकील म्हणूनही जावे लागले. त्या कामी तो यशस्वी झाल्याची नोंद त्या वेळच्या अहवालात पाहावयास सापडते.

त्यानंतर त्याला इतरही नागरी सन्मानाच्या जागा मिळाल्या. परंतु दुर्दैवाने–विशेषतः दान्तेच्या–कौटुंबिक भांडणांमुळे फ्लॉरेन्सच्या गेल्फ्समध्ये फूट पडू लागली. कँचेलिअरी" (Cancelliery) कुटुंबाच्या दोन शाखांमध्ये बेबनाव होऊन श्वेत ( Whites ) आणि कृष्ण ( Blacks ) असे दोन तट पडले. वास्तविक हे भांडण पिस्टोइआ ( Pistoia ) शहराचे. पण त्यात फ्लॉरेन्सचे गेल्फ्स मध्ये पडले आणि नंतर झालेल्या मोठ्या चकमकीतून दोन सैनिकी छावण्या उभ्या झाल्या. राजकीय आणि सैनिकी स्वरूपाच्या बऱ्याच घडामोडींच्या शेवटी त्या वेळचा पोप बॉनिफेस आठवा याची मध्यस्थी घेण्याचे ठरले. दान्ते त्या वेळी "प्रायर" (Prior) ह्या महत्त्वाच्या पदावर होता. "श्वेतां"चा प्रतिनिधी म्हणून त्याला पोपशी बोलणी करायला पाठविण्याचे ठरले. तो प्रत्यक्षात त्याला भेटला किंवा नाही याबद्दल मतभेद आहेत. पण ह्या घटनेचे महत्त्व जितके दान्तेच्या आयुष्याशी निगडित आहे, तितकेच, किंबहुना त्याहून जास्त, त्याच्या 'कॉमेडी'शी निगडित आहे. 'कॉमेडी'त ह्या पोपचा वारंवार उल्लेख येतो आणि दान्तेने त्याला कायमचा नरकात लोटला आहे. बॉनिफेस आठवा म्हणजे मूर्तिमंत भ्रष्टाचार आणि दुराचार अशी त्याची प्रतिमा आहे. पोपच्या मध्यस्थीनंतरच्या घटनांमध्ये "कृष्णां"नी फ्लॉरेन्सचा ताबा घेतला. त्यापूर्वी दान्तेला प्रायर






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणून काही "कृष्णां"ना हद्दपार करण्याचे काम करावे लागले होते. ह्या हद्दपार केलेल्या लोकांत दान्तेने त्याचा कवी मित्र कॅव्हलकँटी व त्याच्या पत्नीचे काही नातलग यांनाही हद्दपार केले होते. आता "कृष्ण" परत आल्यानंतर त्यांनी आपला सूड उगवला. पूर्वीचे हद्दपार जल्लोषात परत आले आणि त्यांनी दान्तेला हद्दपार केले. त्याच्यावर आरोप ठेवण्यात आले होते, पण त्यांना विशेष अर्थ नव्हता. त्याचा खरा गुन्हा हा विरोधी पक्षात असणे हाच होता. आज विसाव्या शतकात ज्या प्रकारे हे निरनिराळ्या देशांत चालले आहे, ते पाहता दान्तेच्या काळाचे आपल्या काळाशी असलेले महत्त्वाचे साम्य लक्षात यावे. दान्तेने स्वतःच असे म्हटले आहे, की ज्याला व्यवहारी राजकारणीपणा म्हणतात त्याचा त्याच्यापाशी अभाव होता. त्याच्या जोडीला त्याचा स्वभाव जुळवून घेण्याचा किंवा तडजोड करण्याचा नव्हता. त्यातून त्याची जीभपण तिखट होती. तो गेल्फ होता हे खरे आहे. गेल्फ्सची घटनाप्रियता आणि उदारमतवाद त्याला मनापासून आवडत असत. त्याचप्रमाणे त्यांचा धार्मिक सोवळेपणाही त्याला मान्य होता. पण त्यांची वाढती व्यापारी वृत्ती आणि उथळपणा ह्यांचा त्याला तिटकारा होता. पोपची वाढती भौतिक सत्ता आणि त्याचा भ्रष्टाचार ह्यांना ह्या गेल्फ मध्यमवर्गाची मान्यता होती. पण ती त्याला पूर्णपणे निषेधार्ह वाटत होती. चर्चचा सत्ता आणि संपत्ती ह्यांचा हव्यास आणि ती मिळविण्याचे भ्रष्ट मार्ग, तसेच चर्च आणि पोप यांनी चालविलेल्या हलक्या प्रतीच्या राजकीय हालचाली ह्यांचा दान्ते धिक्कार करीत असे. ह्याच कारणासाठी गेल्फ्सना तो आपला वाटत नसे. अनेकांना तो घिबेलाइनच आहे असे वाटत असे. आणि तसे त्याला घिबेलाइन्सचा रार्जबिंडेपणा, त्यांचे औदार्य, त्यांची शाही, खानदानी वर्तणूक आणि विशेष म्हणजे त्यांची कलासक्ती आणि विद्याप्रेम आणि त्यांना आश्रय देण्याची रसिक मनोवृत्ती ह्यांचे आकर्षण होते. मात्र त्याचबरोबर त्यांच्या अधार्मिकतेबद्दल त्याला तीव्र नापसंती होती. त्यांची तत्त्वच्युती, त्यांची कायद्याबद्दलची बेपर्वाई, त्यांची जुलूमशाही ह्यांचाही त्याला तिटकारा होता. दान्तेला मनोमन याचीही खात्री होती, की घिबेलाइन्सची राज्यपद्धती ही कालबाह्य झाली आहे, आणि ती नष्ट होण्याच्या मार्गावर आहे.

अशा प्रकारच्या व्यक्तिमत्त्वाला राजकारण न जमले तर आश्चर्य वाटायला नको. त्याचबरोबर तत्कालीन राजकारणाच्या त्याच्यासारख्या चिकित्सक निरीक्षकाने राज्य आणि राजसत्तेचे स्वरूप यांविषयी चिंतन करणेही अटळ होते. त्याचाच परिपाक म्हणजे दान्तेचा राज्यशास्त्रावरील "डी मॉर्नाकिआ" (De Monarchia) हा ग्रंथ.

कॅम्पाल्डिनोच्या लढाईनंतरची जवळजवळ दहा वर्षे दान्तेने अध्ययनात घालविली. त्या वेळचा एक सुप्रसिद्ध मुत्सद्दी आणि विद्वान ब्रुनो लॅटिनी (Bruno Latini) याच्या मार्गदर्शनाखाली त्याचे शिक्षण झाले होते ('Inferno'च्या XV 22 sqq मध्ये दान्ते त्याच्याबद्दलचा आपला शोक प्रकट करताना आपल्याला आढळतो.). तरुण वयातच त्याला प्रॉव्हेन्सची भाषा आणि वाङ्मय यांचा चांगला परिचय झाला होता. त्या वेळची इटालिअन कविता प्रॉव्हेन्सचा आदर्श समोर ठेवून लिहिली जात होती. त्या पाठोपाठ त्याने तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र, विज्ञान (विशेषतः खगोलशास्त्र) आणि अभिजात काव्य ह्यांचा अभ्यास केला होता. लॅटिन भाषेत उपलब्ध असलेले सर्व ज्ञान त्याने आत्मसात केले होते. त्यात प्लेटोचे 'Timaeus', सिसरो, व्हर्जिल, होरेस, ओव्हिड, स्टेटिअस आणि लूकन यांबरोबरच सेंट ऑगस्टीन आणि इतर धर्मोपदेशकांचे लेखन आणि सेंट टॉमस ॲक्विनास इ. साक्षात्कारी संतांच्या वाङ्मयाचा समावेश होता. सेंट टॉमस ॲक्विनासच्या तत्त्वज्ञानाचा दान्तेवर फार मोठा प्रभाव होता व तो आपल्याला त्याच्या 'कॉमेडी'त ठायी ठायी आढळतो. त्याची अभ्यासातील एकाग्रता वाखाणण्यासारखी होती. ह्याबद्दलची एक आख्यायिका अशी आहे की, एकदा दान्ते एका नव्या पुस्तकाच्या वाचनात एका दुकानाबाहेर पाच-सहा तास मग्न होता आणि दरम्यान रस्त्यावरच्या कुठल्याशा उत्सवाच्या गर्दीगोंगाटाकडे त्याचे लक्षही गेले नाही. दान्तेचे वाचन प्रचंड होते आणि तो तासन्तास डोळे दुखेपर्यंत वाचत असे. परंतु असे असले, तरी त्याच्या दैनंदिन व्यवहारातील वागणुकीवरून आणि वृत्तीवरून कुणालाही तो फारसे वाचत असेल असे वाटत नसे. त्याला चित्रकलेतही गोडी होती आणि तो गातही असे. चारचौघांच्या सोबतीत मौजमजा करण्यात त्याला आनंद वाटत असे.

याच सुमारास १२९८ च्या आसपास त्याचे लग्न झाले. त्याची पत्नी जेम्मा (Gemma) मॅनेटो

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डोनाती (Manetto Donati) ची मुलगी, खानदानी गेल्फ कुटुंबातील होती. तिच्यापासून त्याला चार मुले झाली. तो संसारात सुखी होता की दु:खी, याबद्दल चरित्रकारांमध्ये मतभेद आहेत. एवढेच फक्त म्हणता येते की, त्याची वाचनाची सवय घरातल्या सर्वांनाच फार जाचक वाटत होती.

दान्ते हद्दपार झाला त्या वेळी त्याचे कुटुंब फ्लॉरेन्स-मध्येच राहिले. हद्दपार मंडळींनी पुन्हा एकदा फ्लॉरेन्सवर हल्ला करण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. आणि मग त्यानंतर दान्तेने इतर हद्दपारांचा पक्ष सोडला आणि तो जवळजवळ वीस वर्षे हद्दपार म्हणून एकटा भटकत राहिला. काही काळ स्काला (Scala) कुटुंबा-बरोबर तर काही काळ मालास्पिनास (Malaspinas) कुटुंबाबरोबर तो राहिला. दरम्यान जशी जशी त्याला कीर्ती मिळू लागली तसे तसे त्याचे जीवन अधिक सुसह्य होऊ लागले आणि आयुष्याची शेवटची वर्षे त्याने रॅव्हेन्नात आनंदाने घालविली. मुत्सद्देगिरीच्या काम-गिरीवरून व्हेनिसहून परत येताना तो आजारी पडला आणि त्यातच त्याचा अंत झाला. आपल्या हद्दपार जीवनाचे त्याने ( Paradiso ) 'पॅराडीझो'च्या XVII व्या कँटोत फार हृदयस्पर्शी वर्णन केले आहे. तो म्हणतो,

" Thou shalt abandon each and every thing
Most dear to thee : that shaft's the first that e'er
The bow of exile looses from the string;
Thou shalt by sharp experience be aware
How salt the bread of strangers is, how hard
The up and down of someone else's stair; "
(Para. XVII, 55–60)

दान्तेच्या जीवनातील या सर्व चढ-उतारांना निष्प्रभ ठरवील अशा त्याच्या बालपणातील एका घटनेकडे आता आपल्याला वळायला हवे. ह्याही घटनेची माहिती आपल्याला त्याच्या " व्हिटा नोव्हा " ( The New Life) या पहिल्या काव्यातच मिळते. दान्ते त्या वेळी नऊ वर्षांचा होता. त्याच्या वडिलांबरोबर तो फ्लॉरेन्स येथील फोल्को पोर्तिनारी ( Folco Portinari ) नामक एका श्रीमंत गृहस्थांकडे मे दिवसाच्या पार्टीसाठी गेला होता. आणि इथेच त्याची पोर्तिनारीच्या ७–८ वर्षांच्या मुलीशी भेट झाली. बस्, एवढीच ती घटना आहे. पण ह्या घटनेने दान्तेचे अवघे जीवन व्यापून टाकले. तिनेच त्याच्या जीवनाला दिशा मिळाली. उद्दिष्ट लाभले. ह्याच घटनेच्या प्रकाशात दान्तेला त्याची पृथ्वी आणि स्वर्ग दिसले– त्याचे अलौकिक दैवी गान सापडले.

बिॲट्रिस हे त्या मुलीचे नाव. ती प्रथम दिसली त्या प्रसंगाचे दान्तेने वर्णन केले आहे. तो म्हणतो :

" She appeared to me dressed in a most noble colour, a rich and subdued red girded and adorned in a manner becoming to her very tender age. (Hell, Introduction, P. 26).

तिला पाहताच त्याचे अंत:करण थरथरले आणि तो उद्गारला, " Behold a god stronger than I that is come to bear rule over me."

त्याचा आत्मा आणि बुद्धी आश्चर्यवत त्या दैवी रूपाकडे पाहत राहिले आणि त्याच्या डोळ्यांना म्हणाले, " Now is your bliss made mani-fest.."

आणि त्याच्या इंद्रियसंवेदना व्याकूळ होऊन म्हणाल्या, " Alas : how often henceforth shall we be troubled."

बिॲट्रिस त्यानंतर दान्तेचे चेतनाकेंद्र बनली, त्याच्या आयुष्याचा प्रकाशस्रोत झाली. त्या भेटीने दान्तेच्या आयुष्यात एक अद्भुत किमया घडवून आणली. तिने केलेल्या किमयेचे स्वरूप दान्तेच्याच शब्दांत सांगितलेले बरे :

" I say that when she appeared from any direction, then, in the hope of her wondrous salutation, there was no enemy left to me, rather there smote into me a flame of charity, which made me forgive every person who had ever injured me and if at that moment anybody had put a question to me about anything what-




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

soever, my answer would have been simply 'love' with countenance clothed in humility." (Hell, Introduction, P. 28).

एखादा साक्षात्कार घडावा आणि जीवनातले प्रेय आणि श्रेय एकत्र एकवटलेले सापडावे तसे दान्तेचे झाले. योजने दूर असलेला स्वर्ग दान्तेला दोन बोटे उरला. दान्तेच्या महायात्रेला इथेच प्रारंभ झाला. दान्तेने आपल्या महाकाव्याला फक्त 'कॉमेडी' हेच नाव दिले होते. पुढे कुणीतरी (बहुधा बोकॅचिओने) त्याला "डिव्हाइन" हे बिरुद बहाल केले. ते करताना त्याला नक्की काय म्हणायचे होते, हे सांगणे कठीण आहे. पण ते वरील अर्थानेही फार सार्थ आहे एवढे खरे.

दान्तेचे हे प्रेम खरेखुरे निष्काम प्रेम असले पाहिजे. त्यात कुठलीही अपेक्षा नव्हती. बिॲट्रिसचे १२८७ मध्ये एका सिमॉन डि बॉर्डी (Simone dei Bardi) नावाच्या बँकरशी लग्न झाले. या गोष्टीचा दान्ते साधा उल्लेखही करीत नाही. तो अठरा वर्षांचा असताना एकदा त्याची तिच्याशी रस्त्यात गाठ पडली. त्या वेळी तिने ओळख दर्शविली आणि ती त्याच्याशी बोलली. त्याही प्रसंगाने दान्तेचे अंतःकरण उचंबळून आल्याचे आपल्याला दिसते. त्याही भेटीचे वर्णन दान्तेने स्वर्गतुल्य आनंद देणारी, असे केले आहे. त्यानंतर पुढे एकदा त्याच्याबद्दलच्या बदनामीकारक अफवांमुळे तिने त्याला ओळख दर्शविली नाही. त्या वेळी त्याला आणखी एक साक्षात्कार झाला. तो म्हणजे प्रेम ज्याप्रमाणे जीवनात अत्युत्कट आनंद निर्माण करते त्याचप्रमाणे ते आयुष्य यातनामयही करू शकते. त्यानंतरच्या आणखी एका पार्टीतल्या भेटीत बिॲट्रिसने दान्तेची टिंगल केल्याचा उल्लेख मिळतो. त्यामुळे दान्तेला मरणप्राय वेदना झाल्या. १२८९ मध्ये बिॲट्रिसचे वडील वारले, त्या वेळी दान्ते तिच्या दुःखाने विव्हल झाला. पुढे एका वर्षाने बिॲट्रिसही वारली त्या वेळी जीवनातला सारा प्रकाशच लोपला असे दान्तेला वाटले.

अशी ही वरवर अतिशय सामान्य वाटणारी प्रेमकहाणी. पण तिनेच दान्तेला अनंताचा महायात्री बनवले आणि तिच्याशी एकरूप होण्याकरिता त्याने पृथ्वी, नरक व स्वर्ग पालथे घातले. एखाद्या अढळ ताऱ्याप्रमाणे बिॲट्रिस त्याला प्रकाश देत राहिली. दिशा दाखवीत राहिली. त्याला मार्गदर्शन करत राहिली आणि अनंताच्या त्या अंतिम केंद्रबिंदूत तिने स्वतःबरोबर त्यालाही आपल्यात विलीन करून घेतले.

दान्तेची 'डिव्हाइन कॉमेडी' ही आहे. जीवन आणि काव्य यांचा एवढा सुंदर मिलाफ, त्यांची परस्परांतील इतकी अद्भुत एकरूपता जगाच्या वाङ्मयात अन्यत्र आढळत नाही.

– २ –

दान्ते परागंदा असताना १३१५ च्या सुमारास सर्व हद्दपारांना क्षमा करणारा (amnesty) एक फतवा निघाला. हद्दपारांनी जाहीरपणे पश्चात्ताप व्यक्त करावा आणि परत यावे अशा प्रकारची ही आम क्षमा होती. दान्तेच्या मित्रांनी त्याला या संधीचा फायदा घेऊन परतण्याची विनंती केली– त्या वेळी दान्तेने लिहिलेले पत्र त्याच्या कणखर व्यक्तिमत्त्वाची साक्ष देणारे आहे. स्थलाभावी इथे त्याचा एक लहानसा अंशच उद्धृत करीत आहे :

"That, Father, is not the way to return to my country. If any other way can be found... that may not be derogating to Dante's reputation and honour, I shall not be slow to accept it. But if I cannot enter Florence by such a way, then I will never enter Florence. What then ? Can I not everywhere gaze upon the mirror of the sun and stars ? Can I not everywhere under heaven mirror forth the most precious truths, without first making myself inglorious, nay, ignominious in the sight of the city of Florence ? I shall not want for bread."

(अधोरेखित माझे.)

ह्या पत्रातील अधोरेखित वाक्यांत आपल्याला दान्तेसमोर कोणते महत्त्वाचे कार्य होते, याची स्पष्ट सूचना मिळते. मिल्टन To justify the ways of God to man हे ध्येय समोर ठेवून आपले महाकाव्य लिहायला बसला. दान्ते आता ग्रहताऱ्यांकडे पाहणार होता आणि आपल्या अंतःकरणाच्या तळाशी गवसलेली अमोल सत्ये त्यामधून परावर्तित करणार होता. तो आता आपली "Commedia Dantis


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

Aligherii florentini natione non moribus" (The Comedy of Dante Alighiery, a Florentine by birth but not by Character) लिहिणार होता. हद्दपार दान्ते– आशा-आकांक्षा धुळीला मिळालेल्या, तारुण्य संपलेले, प्रेम हरपलेले, घरदार, आप्त पारखे झालेले, राजकीय स्वातंत्र्य आणि न्यायाचे स्वप्न कायम दुरावलेले– असा दान्ते– नि:संग दान्ते. बाहेर चर्च आणि साम्राज्य यांत भ्रष्टाचार माजलेला, मानवी हृदयाचा नरक झालेला. Hell. Inferno... ह्या Hell मधून निघून आत्मशुद्धी आणि आत्मज्ञानाच्या मार्गाने तो स्वर्गाकडे निघणार होता. तो आपली 'डिव्हाइन कॉमेडी' लिहिणार होता.

'डिव्हाइन कॉमेडी' हे तसे ज्याला इंग्रजीत Unique म्हणतात असे एकमेवाद्वितीय महाकाव्य आहे. इतर महाकाव्यांपेक्षा ह्याची पद्धती आणि रचना अगदी वेगळ्या प्रकारची आहे. ह्याचा 'नायक' हा स्वत: कवीच आहे. ह्यातील प्रसंग कथानकाला मुरड घालत नाहीत की वळण देत नाहीत. मोठाल्या साहसांच्या घटनांऐवजी ह्यात धर्मतत्त्वांची किंवा आध्यात्मिक अनुभूतींची चर्चा आहे. ज्या जगात कवी वाचकाला घेऊन जातो त्यातील व्यक्ती ह्या काही उदात्त कथानकांतील पात्रांसारख्या नाहीत, तर ज्यांची कवीला प्रत्यक्षपणे किंवा त्यांच्याबद्दलच्या कथांद्वारे माहिती होती, अशी माणसे आहेत. ह्याचे उद्दिष्ट आनंद देणे नसून निर्भर्त्सना करणे, निषेध व्यक्त करणे, किंवा उपदेशात्मक बोलणे अशा प्रकारचे आहे. कशा प्रकारचे आयुष्य जगल्याने कशा प्रकारचे पुण्य पदरी पडते किंवा पापाला कशी शिक्षा मिळते, या प्रकारच्या चर्चेतून माणसांना सत्प्रवृत्त करणे असे आहे. कवी म्हणतो त्याप्रमाणे, "to put into verse things difficult to think' अशा स्वरूपाचे हे उद्दिष्ट आहे.

प्रत्यक्ष 'कॉमेडी'च्या परिचयाला सुरवात करण्यापूर्वी तिच्या आणखी एक-दोन वैशिष्ट्यांचा उल्लेख करणे आवश्यक आहे. पहिले महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्या काळात काव्याची आणि धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, विज्ञान इ. सर्वांची प्रचलित आणि शिष्टमान्य भाषा लॅटिन असताना दान्तेने आपली 'कॉमेडी' Vulgar tongue" म्हणजे सामान्य माणसाच्या भाषेत लिहिली. याचा उद्देश सर्वसामान्य माणसाने, स्त्रियांनीही ("Even women can exchange ideas") हे काव्य वाचावे असा होता. चवदाव्या शतकाच्या आरंभी हे एक क्रांतिकारक पाऊल होते. आणि दान्तेने आपल्या या निर्णयाचे फार जोरदार समर्थन केले आहे. ह्या नव्या भाषेसंबंधी तो म्हणतो,

" ...... a new light, a new sun, which shall rise whereas the accustomed one (Latin) shall set, and which shall give light to those who are in darkness because the accustomed sun does not give them light."

(या ठिकाणी एका योगायोगाचा उल्लेख केला तर तो मराठी रसिकांना आवडेल, 'कॉमेडी'चा 'इन्फर्नो' दान्तेने १३०८ मध्ये पूर्ण केला होता. तत्पूर्वी–म्हणजे फ्लॉरेन्समधून हद्दपार होण्यापूर्वी–त्याने इन्फर्नोचे ७ कँटो लिहून पूर्ण केले होते. आपल्याकडे जवळजवळ त्याच सुमारास आणि स्थूलमानाने त्याच प्रकारचे (म्हणजे आध्यात्मिक स्वरूपाचे) एक काव्य लिहिले गेले. ते म्हणजे श्रीज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी. ज्ञानेश्वरी १२९० मध्ये पूर्ण झाली आणि संस्कृतची कास सोडून ज्ञानेश्वरांनी ती बुद्धया मराठीत लिहिली! या ठिकाणी योगायोगापलीकडे मला दुसरे काहीच सुचवावयाचे नाही हे आवर्जून सांगावेसे वाटते.)

आपल्या काव्याला अधिक लोकाभिमुख स्वरूप देण्याच्या दृष्टीने दान्तेने लोकभाषेबरोबरच आणखी एका गोष्टीचा उपयोग करून घेतला. लोकमानसात रुजलेल्या दोन कथाप्रकारांना त्याने एकत्र गुंफले. एक म्हणजे धार्मिक परंपरेने जनसामान्यांना चिरपरिचित असलेल्या हेल, पर्गेटरी, पॅरडाइझ ह्यांचे दर्शन आणि दुसरी कथा म्हणजे आपल्या प्रेयसीला प्राप्त करून घेण्यासाठी पाताळात जाऊन अनेक साहसे करणाऱ्या नायकाची. आणि ही सर्व गुंफण त्याने आपल्या स्वत:च्या अनुभवाच्या सूत्राने केली. कारण 'कॉमेडी' ही मानवाच्या आत्मक्षालनाची आणि आत्मज्ञानाची कथा असली, तरी ती प्रथमत: आणि अंतिमत: दान्तेची स्वत:ची आत्मकथा आहे.

आणि म्हणूनच 'कॉमेडी' ही एक ॲलेगरी (प्रतीकात्म आख्यान) होणे अपरिहार्य होते. स्थूलमानाने आपण असे म्हणू शकतो की, अनुभवांचा प्रतिमांच्या साह्याने अर्थ लावण्याची काव्यप्रक्रिया म्हणजे











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ॲलेगरी. सर्वसाधारणपणे ॲलेगरीमध्ये वरवर दिसणारे एक कथानक असते. त्यात संकटे असतात. साहसे असतात. बऱ्याच घडामोडी असतात. परिस्थितीचे चढ-उतार असतात, निरनिराळ्या सजीव व्यक्ती किंवा प्राण्यांमध्ये संघर्ष असतो, वगैरे. पण हे सर्व 'खरे' नसते. म्हणजे ते प्रत्यक्षात, वास्तवात घडलेले नसते. पण या व्यक्तींच्या किंवा प्राण्यांच्या मागे असलेल्या कल्पना किंवा प्रवृत्ती किंवा भयक्रोधादी भावना, तसेच कथानकातील संघर्ष-संकट-साहसांच्या पाठीमागे ज्या कल्पना किंवा भावना असतात त्या किंवा त्यांमधील जे ताणतणाव अभिप्रेत असतात ते सर्व 'खरे' असतात. The tale is fiction. The allegorical meaning is the true story. परंतु दान्तेची 'कॉमेडी' ह्याहूनही वेगळी अशी ॲलेगरी आहे. यातले 'कथानक' एकदम 'खोटे' नाही. काही एका मर्यादेपर्यंत तेही खरेच आहे. शिवाय यातील पात्रे नुसतीच खरी नाहीत, तर काही तुरळक अपवाद वगळले तर, ती प्रतीकेही आहेत. यामुळे 'कॉमेडी'चे आकलन काहीसे गुंतागुंतीचे होण्याची शक्यता असते, पण त्याच-बरोबर तिची व्यामिश्रता वाढून ती बहुआयामी बनत जाते हेही तितकेच खरे आहे.

याचे थोडेसे स्पष्टीकरण यायला हवे. एका उदा-हरणाने ते करता येईल, दान्तेच्या 'इन्फर्नो' मधल्या प्रवासात 'विवेकबुद्धीने' त्याचे मार्गदर्शन केले. हे दान्तेने नेहमीच्या प्रतीक वापरण्याच्या पद्धतीने केले असते, तर त्याला विवेकबुद्धीला समूर्त करावे लागले असते– म्हणजे एखादी स्त्री किंवा पुरुष 'विवेकबुद्धी' आहे असे त्याला सुचवावे लागले असते. त्याचप्रमाणे दान्तेला ह्या प्रवासात 'विज्ञाना'नेही मार्गदर्शन केले, म्हणून त्यासाठीही तशी एखादी व्यक्ती योजावी लागली असती. 'कला'पण मार्गदर्शनासाठी होतीच. मग त्यासाठीही त्याला अशीच एखादी योजना करावी लागली असती. पण दान्ते असे काही न करता सरळ 'व्हर्जिल' या महाकवीलाच आपला मार्गदर्शक म्हणून बरोबर घेतो. आता व्हर्जिल ही खरी व्यक्ती, पण 'कॉमेडी'तील व्हर्जिल खरा असूनही ज्ञान, विवेक, विज्ञान, कला आदींचे प्रतीक म्हणून आपल्यासमोर येत राहतो. त्यामुळे काव्याच्या परिणामाच्या दृष्टीने दान्ते केवढी मोठी गोष्ट साध्य करतो, हे रसिकांना समजावून सांगायला नको.

'इन्फर्नो', 'पुर्गटोरिओ', 'पॅराडीझो' यांतली पात्रे ही नुसती पाप-पुण्याची किंवा दुर्गुण-सद्गुणांची कोरडी प्रतीके नसून ती सर्व खऱ्या व्यक्तींचे आत्मे आहेत.

दान्तेच्या कलाकृतींचे हे समीक्षकांनी केलेले समर्थन आहे, असे एखाद्या वेळेस वाटण्याची शक्यता आहे. पण कला, शैली इ. वाङ्मयीन प्रश्नांबद्दल दान्तेने स्वतंत्र-पणे लिहिलेले आहे (De Vulgari Eloquentia). दान्ते हा अत्यंत जागरूक कवी होता हे आपण लक्षात ठेवायला पाहिजे. 'कॉमेडी'च्या संदर्भात त्याने कान ग्रांद्रे देल्ला स्काला (Can Grande della Scala) ह्याला लिहिलेले पत्र पाहण्यासारखे आहे. त्यांत 'कॉमेडी'तील प्रतीकासंबंधी तो स्वतःच असे म्हणतो;

"The meaning of this work is not simple ... for we obtain one meaning from the letter of it, and another from that which the letter signifies, and the first is called literal, but the other alle-gorical or mystical."

इथे तो बायबलमधील उदाहरण घेऊन स्वतःचे म्हणणे स्पष्ट करतो. आणि शेवटी, 'कॉमेडी' काय आहे ते सांगतो,

"The subject of the whole work, then, taken merely in the literal sense is 'the state of the soul after death straight-forwardly affirmed', 'for the development of the whole work hinges on and about that. But if, indeed, the work is taken allegorically its subject is Man, as by good or ill deserts, in the exercise of his free choice, he becomes liable to rewarding or punishing Justice."

'कॉमेडी'चे स्वरूप हे असे असल्यामुळे त्यात आढळणाऱ्या ऐतिहासिक किंवा समकालीन तपशिलांच्या चुका किंवा काही व्यक्तींबद्दलचे दान्तेचे गैरसमज यांना ह्या काव्याच्या संदर्भात फारसे महत्त्व उरत नाही. तसेच, दान्तेचे हेल, पर्गेटरी, पॅराडाइझ यांची मध्ययुगीन भौगोलिकता आज जरी विज्ञानाने खोटी ठरविलेली असली, तरी त्यांच्या खरेपणाला बाध येत नाही. आणखी असे की, दान्ते जरी फार काटेकोरपणे ह्या तिन्हींचा





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भौगोलिक तपशील देत असला तरी आपण असे मानण्याचे कारण नाही, की त्याचा त्यांच्या भौगोलिक अस्तित्वावर विश्वास होता. काल्पनिक विश्वाला खरेपणा प्रदान करण्याची कवि-कादंबरीकारांची रीत त्याला चांगली अवगत होती.

तर, 'कॉमेडी' ही मुख्यत: चार पातळ्यांवर अनुभवावी लागते :

१) कथानकाची पातळी,
२) समकालीन राजकीय पातळी,
३) नैतिक पातळी आणि
४) आध्यात्मिक पातळी.

अर्थात या पातळ्या काव्यात एकमेकांत बेमालूमपणे मिसळत असतात, परस्परांस छेद देत राहतात. एवढेच नव्हे, तर या आत्म्याच्या महायात्रेला एखाद्या अस्सल कलावंताच्या किंवा प्रेमिकाच्या महायात्रेच्या स्वरूपातही पाहता येते. सत् आणि असत्, साधू आणि असाधू, भौतिक आणि आध्यात्मिक, कर्मण्य आणि अकर्मण्य, नैतिक आणि अनैतिक, व्यक्तीची इच्छाशक्ती आणि नियतीचे नियंत्रण यांसारखे प्रश्न हे 'कॉमेडी'चा विषय आहेत, आणि तरीही ती दान्तेच्या अंतर्विश्वाचे आणि त्याच्या भोवतालच्या सामाजिक-राजकीय विश्वाचे हृदयस्पर्शी दर्शन घडविणारी कलाकृती आहे.

'कॉमेडी'त अभिप्रेत असलेली विश्वाची रचनाही समजून घेणे तिच्या आकलनाच्या दृष्टीने या ठिकाणी आवश्यक आहे. 'कॉमेडी'त व्यक्त होणारे विश्व हे अर्थातच मध्ययुगीन विश्व आहे. विश्वाबद्दलचा मध्ययुगीन दृष्टिकोण हा संपूर्णपणे प्रत्यक्ष निरीक्षणावर किंवा वैज्ञानिक कसोट्यांवर आधारलेला नव्हता. तो बव्हंश धर्मग्रंथांत असलेल्या माहितीवर आणि विचारवंतांच्या तत्त्वचिंतनावर (speculation) आधारलेला होता.

त्याच्या मुळाशी टॉलेमीचा विश्वरचनेसंबंधीचा खगोलशास्त्रीय सिद्धान्त होता. या सिद्धान्तानुसार विश्वाच्या केंद्रस्थानी आपली पृथ्वी होती. ती स्थिर होती आणि सारे ग्रहगोल वा मंडले (Spheres) तिच्याभोवती फिरत होती. त्यांचा फिरण्याचा क्रम पुढीलप्रमाणे होता : (पृथ्वीपासून सुरवात करून) चंद्र, बुध, शुक्र, सूर्य, मंगळ, गुरू, शनी आणि स्थिर ताऱ्यांचे मंडल, त्यानंतर प्रायमम मोबिली (आदिचालक)चे मंडल आणि त्यानंतर एम्पीरिअन, म्हणजेच परमेश्वराचे मंडल.

पृथ्वी आजच्याप्रमाणेच गोल मानली जायची. पण त्याचा आधार वैज्ञानिक निरीक्षण नव्हता, तर त्याच्या पाठीमागे मंडल हा संपूर्ण (perfect) आकार आहे हा विचार होता. पृथ्वीच्या वरचा अर्थ हा जमीन होता आणि खालचा अर्थ पाणी. नकाशांची आणि पृथ्वी-गोलांची (Globe) वरची बाजू 'पूर्व' दाखविण्यात येत असे, कारण जीवनाचे उगमस्थान जो गार्डन ऑफ ईडन तो पूर्वेला होता. धर्मग्रंथातही (इझेकीलचा ५ वा चॅप्टर) हेच सांगितलेले होते. सैतानाला जेव्हा परमेश्वराने स्वर्गातून हद्दपार केले तेव्हा त्याने त्याला स्वतःहून जितके दूर फेकता येईल तितके दूर फेकले. तत्कालीन विश्वरचनेप्रमाणे तो पृथ्वीवर येऊन आदळला. त्याच्या आदळण्याचा वेग आणि जोर इतका प्रचंड होता की, तो थेट पृथ्वीच्या मध्यापर्यंत येऊन पोचला. ह्या धक्क्यामुळे वरून चेपत गेलेला पृथ्वीचा भाग तिच्या दुसऱ्या टोकाकडून एखाद्या पर्वतासारखा बाहेर आला. हाच माउंट पर्गेटरी.

मध्ययुगीन माणसाला सर्व विश्वात एकसूत्रता जाणवायची. सर्व अस्तित्व एका सुबद्ध शृंखलेने एकत्र गोवलेले वाटायचे. परमेश्वर– म्हणजे चिरंतन विशुद्ध अस्तित्व (Pure Being), त्यानंतर देवदूत (Pure Spirit), त्यानंतर माणूस (Spirit and Sensate body), प्राणी (Sense), वनस्पती (Growth) आणि जडवस्तू (Inert) अशा प्रकारची त्याची कल्पना होती.

'कॉमेडी'चे अध्यात्म हे सर्वथा ख्रिश्चन आहे. 'कॉमेडी'तला दान्ते तसा प्रत्येकाचाच आत्मा आहे. त्याचे पाप इतके मोठे आहे की, त्या पापातून मुक्त होण्यासाठी एकीकडे सद्विवेकबुद्धी आणि दुसरीकडे दैवी कृपा (grace) आवश्यक असतात. माणसाच्या भौतिक आणि सामाजिक जगाची कोनशिला ही विवेकबुद्धी असून त्याच्या नैतिक-आध्यात्मिक जगाची उभारणी ही साक्षात्कारातून मिळणाऱ्या दैवी कृपेतून होत असते. ('कॉमेडी'तला दान्तेचा प्रवास व्हर्जिल आणि बिॲट्रिस यांच्या आधाराने होतो याचा हाच अर्थ आहे.)

'कॉमेडी' हे अंतर्बाह्य मध्ययुगीन महाकाव्य आहे. त्यात अंतर्भूत असलेला दृष्टिकोण, त्यातील तर्कपद्धती आणि गूढवाद हे सर्व मध्ययुगीन आहेत. पण







राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यावरून जर कोणी असा ग्रह केला की, त्यात मध्ययुगीन परिस्थिती किंवा तत्कालीन दृष्टिकोण यांचाच पुरस्कार केला आहे, तर ते मात्र बरोबर होणार नाही. 'कॉमेडी'त पुरस्कार असलाच, तर तो परमेश्वरी योजनेचा आहे. आणि त्याचबरोबर जी व्यक्ती किंवा ज्या सामाजिक प्रवृत्ती ह्या परमेश्वरी योजनेच्या आड येतात किंवा तिला विरोधी कृती करतात त्यांचा तीव्र निषेध आणि धिक्कारही त्यात आहे. मुख्य म्हणजे दान्तेची ह्या परमेश्वरी योजनेची कल्पना मध्ययुगीन प्रचलित कल्पनेपेक्षा अगदी वेगळी होती. पृथ्वीवर मानवाचे जीवन ही एक दुःखाची (अश्रूंची) खाई आहे अशी वास्तविक मध्ययुगीन धारणा होती. पण दान्तेला हा विचार सर्वस्वी अमान्य होता. मानवाला मिळालेल्या शक्ती ह्या परमेश्वराने त्याला त्याच्या विकासासाठी दिलेल्या देणग्या आहेत अशी त्याची श्रद्धा होती. मानवाने सत्कर्माने पृथ्वीवर स्वर्ग मिळवावा (निर्माण करावा) आणि ह्याच तयारीतून पुढील चिरंतन सौख्याच्या प्रवासाला लागावे अशी त्याची धारणा होती. त्याच्याच शब्दांत सांगायचे तर,

"Ineffable providence has thus designed two ends to be contemplated of man : First, the happiness of this life, which consists in the activity of his natural powers, and is prefigured by the Earthly paradise and then the blessedness of life everlasting...... which may be symbolised by the Celestial paradise."

(Do Monarchia)

'कॉमेडी'चे बाह्य स्वरूपही दान्तेने परमेश्वरी योजनेला समोर ठेवूनच ठरविल्यासारखे दिसते. 'कॉमेडी'चे तीन भाग आहेत : इन्फर्नो (Inferno / Hell), पुर्गटोरिओ (Purgatorio) आणि पॅराडीझो (Paradiso). यांतील प्रत्येक भाग (Cantica) हा स्वतंत्र असला तरी ते तिन्ही एकाच महायात्रेचे तीन मुक्काम आहेत. प्रत्येक भाग हा ख्रिश्चन त्रिमूर्तीची (Trinity : Father, Son & Holy Ghost) अभिव्यक्ती आहे. प्रत्येक भागात ३३ कँटो आहेत. असे तीन भागांत मिळून ९९ कॅन्टो होतात. त्यांच्यात सुरवातीचा प्रास्ताविकाचा कँटो मिळविला, तर एकूण १०० कँटो होतात. शंभर हा दहाचा वर्ग असून दहा हा 'संपूर्ण' अंक आहे (perfect). कारण तो त्रिमूर्तीच्या तीनचा वर्ग अधिक परमेश्वराच्या एकत्वाचा असा बनलेला आहे. दान्तेने मुद्दाम वापरलेले Terza Rima हे वृत्तही लक्षणीय आहे, कारण यात प्रत्येक तिसऱ्या चरणात यमक साधलेले असते.

आज आपल्याला हे सर्व काहीसे पोरकटपणाचे वाटणे शक्य आहे. (अर्थात वैज्ञानिक दृष्टचा अत्यंत प्रगत राष्ट्रातसुद्धा आजही आपल्याला मोठमोठ्या मंडळींचा अंकांवरचा आणि शुभदिनांवरचा विश्वास पाहायला सापडतो, मोठाल्या योजनांमागे आजही 'मुहूर्त' उभा असतो, हे लक्षात घेतले म्हणजे वरील प्रकार तितकासा हास्यास्पद वाटणार नाही.) परंतु सौंदर्याच्या कल्पनेमध्ये 'फॉर्म' (आकृतिबंध) फार महत्त्वाचा असतो हे लक्षात घेतले आणि मध्ययुगीन जगात ह्या अंकांना अतिशय महत्त्व होते ह्याचा विचार केला, तर दान्ते कवी म्हणून आणि मध्ययुगीन व्यक्ती म्हणून केवळ एक आवश्यक रीत किंवा उपचार पाळत होता हे पटेल. असो.

– ३ –

'कॉमेडी'च्या सुरवातीलाच दान्ते विषयाच्या गाभ्याला हात घालतो. इन्फर्नोच्या पहिल्याच कडव्यात पुढे उलगडत जाणारे नाट्य, काव्य, प्रतीकात्मकता आणि ओघ एकवटलेले आपल्याला आढळतात.

"Midway this way of life we're
bound upon,
I woke to find myself in a dark wood,
Where the right road was wholly
lost and gone."

(Inferno, I, 1–3)

('कॉमेडी'तील सर्व उद्धरणे डॉरोथी सेयर्सने पेंग्विन क्लासिक्ससाठी संपादित केलेल्या Hell, Pargatory आणि Paradise मधून घेतली आहेत.)

'कॉमेडी'ची सुरवात इ. स. १३०० मधील ईस्टरपूर्वीच्या शुक्रवारी पहाटे होते. आपण योग्य मार्गापासून दूर आलो असून एका अंधाऱ्या जंगलात हरवलेलो आहोत हे दान्तेच्या लक्षात येते. त्यातून निसटण्यासाठी दान्ते समोर दिसणाऱ्या सुंदर पर्वतावर चढायचा प्रयत्न करतो. पण प्रथम एक चित्ता, मग एक सिंह आणि त्यानंतर एक लांडगा त्याचे प्रयत्न विफल करतात. दान्ते परत जंगलाकडे धाव घेतो. पण त्याला


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

व्हर्जिलची छाया थांबवते. व्हर्जिल त्याला सांगतो की, त्या लांडग्याला टाळून त्याला जाता येणार नाही, आणि पर्वत चढता येणार नाही. जंगलातून सुटण्यासाठी त्याला दुसरा मार्ग घ्यायला हवा. त्याने व्हर्जिलवर विश्वास ठेवून त्याच्या मार्गदर्शनाखाली चालायला हवे. तो त्याला हेल आणि पर्गेटरीतून बाहेर काढेल. नंतर त्याच्यापेक्षाही योग्य अशा मार्गदर्शकाच्या स्वाधीन दान्ते होईल (बिॲट्रिस) आणि ती त्याला स्वर्गातल्या आत्म्याचे दर्शन घडवील. दान्ते व्हर्जिलला आपला गुरू, मार्गदर्शक आणि स्वामी म्हणून स्वीकारतो आणि त्यांचा प्रवास सुरू होतो.

एखाद्या साहसकथेचा भासावा असा हा प्रारंभ आहे. पण उघडच त्यातून ध्वनित होणारे वास्तव हे वेगळ्या पातळीवरचे आहे. आयुष्याच्या मध्यभागी म्हणजे सुमारे ३५व्या वर्षी दान्तेच्या मानसिक विश्वात फार मोठे संक्रमण झाले असले पाहिजे. यामागे तत्कालीन विचारवंतांमध्ये आढळून येणारी गूढवादाची ( mysticism ) परंपरा आहे. दान्तेवरही या परंपरेचा फार मोठा प्रभाव होता. दान्ते जागा होतो आहे तो त्याच्या अंतर्विश्वात माजलेल्या अंधाऱ्या जंगलात. आणि तसे पाहिले तर त्या वेळच्या इटालीतील राजकीय, सामाजिक आणि नैतिक स्थिती ही एखाद्या निबिड अरण्याहून वेगळी नव्हती. यातून मार्ग काढणे किती दुरापास्त होते हे मोहपापांची प्रतीके असलेल्या त्या श्वापदांद्वारे दान्ते स्पष्ट करतो. (चित्ता- कामवासना / द्वेष; सिंह–अहंकार / महत्त्वाकांक्षा / हिंसा; लांडगा– अनिबंध हाव इ.) इहलोकीच्या ह्या पापमय जंगलातून मार्ग काढायचा तर समोर दिसणाऱ्या पश्चात्तापाच्या डोंगरावरून जायला हवे. शिवाय सदसद्विवेक बुद्धीचे मार्गदर्शन हवे.

इथे आणखी एक गोष्ट स्पष्ट करायला हवी. ती ही की, आपल्या अंधकारमय जीवनाची जाणीव होण्यासाठी प्रथम अंतःप्रेरणा अगदी सूक्ष्मतम प्रमाणात का होईना, आवश्यक असते. वयाच्या ९ व्या वर्षी बिॲट्रिसच्या भेटीने जे दान्तेच्या जीवनात घडले, ते या जाणिवेच्या स्वरूपाचे असले पाहिजे. म्हणूनच दान्तेसाठी बिॲट्रिस ही साधी हाडामांसाची प्रेयसी नसून त्याची सर्वार्थाने जीवनसहचरी आहे. अंतःप्रेरणा जरी असली तरी भौतिक जगातून मार्ग काढायचा असला, तर विवेकबुद्धी (Reason) ची आवश्यकता असते हेच दान्तेला व्हर्जिलच्या प्रतीकातून सुचवायचे आहे. आणि मागे म्हटल्याप्रमाणे व्हर्जिल म्हणजे नुसती Reason नाही तर ज्ञान, विज्ञान, मानवता इ. अनेक ऐहिक जीवनमूल्यांचे प्रतीक आहे; तर बिॲट्रिस अंतःप्रेरणेतून निर्माण होणाऱ्या साक्षात्काराचे (Revealed Religion).

'डिव्हाइन कॉमेडी' हे महाकाव्य या पद्धतीने सावकाश आपल्याला दान्तेच्या आणि मानवाच्या आणि आपल्याही अनुभवाचे पापुद्रे बाजूला सारत सारत या अथांग मनाच्या खोल तळाशी घेऊन जाते आणि नंतर दान्तेबरोबरच त्यातून हलके हलके प्रकाशाच्या चिरंतन विस्तारत जाणाऱ्या विश्वात घेऊन जाते. अनंत मंडले ओलांडून आनंदमय जगात नेऊन सोडते.

अर्थात या पद्धतीने पूर्ण 'कॉमेडी'चा परिचय करून देणे इथे स्थलाभावी शक्य नाही. आणि ते माझ्या आवाक्यातले आहे असे मला वाटतही नाही. तेव्हा स्थूल मानाने प्रत्येक कँटिकाचे म्हणजे इन्फर्नो, पुर्गटोरिओ आणि पॅराडिझोचे स्वरूप विशद करून सांगण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

दान्तेचा इन्फर्नो ख्रिश्चन धर्मग्रंथाप्रमाणेच एक गर्ता आहे (The Pit). दान्तेचा नरक पृथ्वीच्या उरातच आहे. पृथ्वीच्या सर्वांत वरच्या टोकाला ऐहिकातले जेरुसलेम आहे. ही गर्ता जसजसे पृथ्वीच्या गुरुत्वमध्याकडे जावे, तसतशी निमुळती होत जाते. या नरकाच्या महाद्वाराला कुठलाच अडसर नाही. हे द्वार सर्वांसाठी खुले आहे. 'whose threshold is denied to none' ( Inf. XII-87 ) आणि जे पापारण्यात हरवलेले आहेत त्यांची वाट पाहत ते उभे आहे. इन्फर्नोच्या तिसऱ्या कँटोच्या आरंभी ह्या द्वारावर काळ्या रंगात पुढील वचने लिहिलेली आपल्याला आढळतात–

Through me the road to the city of desolation,
Through me the road to sorrows diuturnal,
Through me the road among the lost creation.

Justice moved my great maker; God eternal





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

Wrought me : The power, and the unsearchahably
High wisdom, and the primal love supernal.

Nothing ere I was made was to be
Save things eterne, and I eterne abide;
Lay down all hope, you that go in by me.

द्वारातून प्रवेश करताच ज्याला Vestibule of Hell किंवा Ante-Hell म्हणतात असा चाडीच्या आकाराचा भाग लागतो. त्यांत ज्या देवदूतांनी स्वर्गातल्या युद्धाच्या वेळी देवाची किंवा दानवाची कुणाचीच बाजू घेतली नव्हती अशांचे आत्मे वास करतात (दान्तेच्या इन्फर्नोमधला हा भाग इतर ख्रिश्चन धर्मग्रंथांत आढळत नाही. ही खास दान्तेची निर्मिती मानली जाते.). कोणतीच गोष्ट स्वीकारायची किंवा नाकारायची नाही अशा मनोवृत्तीच्या लोकांसाठी ही जागा दान्तेने राखून ठेवली आहे. कुठलाच निर्णय न घेऊ शकणारे, कुठलीच निवड न करू शकणारे हे संशयात्मे यात कायमचे सापडलेले आहेत. त्यांना मुक्ती नाही. कुणाचेच आणि कसचेही सोयर-सुतक नसलेल्या, केवळ आपल्या सुरक्षिततेत मग्न झालेल्या या स्वार्थी मंडळींसाठी दान्तेने हे खास यातनाघर निर्माण केलेले आहे. साधू आणि असाधू यांच्या संघर्षात आत्मतुष्ट निष्क्रियता स्वीकारणारे खऱ्या अर्थाने कधी जगलेच नव्हते आणि आता खऱ्या अर्थाने आणि कायमचे (most really and most awfully) कधीच मरणारही नाहीत. एलिअटच्या रसिकांना इथे त्याच्या वेस्टलँडची आठवण करून द्यायला हरकत नाही. एलिअटच्या मरुभूमीतील माणसांची तुलना एलिअटने अत्यंत सूचकपणे या मंडळींशी केलेली आहे. वेस्टलँडचा प्रोटॅगनिस्ट म्हणतो त्याप्रमाणे

I was neither living nor dead, and I know nothing,
Looking into the heart of light, the silence."

(W. L. 39–41)

या संदर्भात एलिअटने आपल्या बॉदलेअरवरील निबंधात जे म्हटले आहे, ते फार उद्बोधक ठरावे. "So far as we are human, what we do must be either evil or good; and it is better, in a paradoxical way, to do evil than to do nothing : atleast, we exist." (S. E., P. 429)

यानंतरचा इन्फर्नो हा खरा Hell. एककेंद्री नऊ मंडलांचा तो बनलेला आहे. प्रत्येक मंडल म्हणजे खोल खोल नेणाऱ्या गर्तेच्या मुक्कामाची एकेक पायरी आहे. ह्यांतील पहिल्या वर्तुळात ज्यांना धर्मदीक्षा मिळालेली नाही (the Unbaptised) असे दोन प्रकारचे लोक आहेत. एक, अजाणपणीच मृत झालेली बालके; दुसरे, असे सर्व लोक जे ख्रिस्ताच्या अवतारापूर्वीच होऊन गेले (Pagans) आणि ज्यांनी आपल्या विवेक-बुद्धीप्रमाणे सद्‌गुणी आणि लोकांना उपकारक असे आचरण केले. व्हेस्टिब्यूलमधील संशयात्म्यांनी निवडीचे स्वातंत्र्य असून निवड केलेली नव्हती, तर पहिल्या मंडलातील आत्म्यांना ही धर्माची निवडच उपलब्ध नव्हती. यांच्यात पूर्वी असेही लोक होते, की त्यांचा ख्रिस्ताच्या आगमनावर विश्वास होता आणि त्यामुळे त्यांना मुक्ती मिळाली. सद्‌गुणी आणि लोककल्याण करणाऱ्यांनाही दान्ते हेलमध्ये ठेवतो. याचे कारण असे की, नुसती मानवतावादी दृष्टी किंवा करुणा ह्या आत्म्याच्या अंतिम मुक्तीला कारणीभूत होऊ शकत नाहीत अशी त्याची धारणा होती. Faith– आध्यात्मिक श्रद्धा– ही मुक्तीसाठी आवश्यक असलेल्या Faith, Hope and Charity ( Love ) पैकी एक आहे.

या पहिल्या वर्तुळातील निवासी--या वर्तुळाला लिंबो (Limbo) असेही संबोधले जाते–कुठल्याही प्रकारची बाह्य शिक्षा भोगताना आपल्याला आढळत नाहीत. तिथे दुःखाचे चीत्कार ऐकू येत नाहीत तर फक्त अंतहीन खोल निःश्वासच आढळतात. हे निःश्वास ईश्वरदर्शनाच्या अपूर्त आसेचे आहेत, दुःखाचे नाहीत.

दुसऱ्या वर्तुळाच्या दाराशीच त्यांना हेलचा न्यायाधीश मिनॉस (Minos) दिसतो. याचे काम प्रत्येक आत्म्याला त्याला योग्य अशा यातना-मंडलात पाठविणे हे आहे.

दुसऱ्या आणि त्यानंतरच्या सात मंडलांमध्ये येणाऱ्या पापात्म्यांची रवानगी होत असते. ॲरिस्टॉटल-

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

प्रमाणेच दान्तेही पापांना तीन प्रमुख भागांत विभागतो : हे तीन भाग आहेत :

१) आत्मसंयमाच्या अभावातून जन्मणारी पापे (Incontinence),

२) पशुत्वातून जन्मणारी पापे (Bestiality), आणि ३) द्वेषबुद्धीतून जन्मणारी पापे (Malice).

पहिल्या प्रकारातून जन्मणाऱ्या पापाचे (Incontinence) धनी हे अनुक्रमे दुसऱ्या, तिसऱ्या, चवथ्या आणि पाचव्या मंडलांत शिक्षा भोगतात. त्यानुसार दुसऱ्या मंडलात कामपीडित, तिसऱ्यात अतृप्त, अधाशी, चवथ्यात अनिर्बंध हाव असणारे व उधळे आणि पाचव्यात क्रोधी व उदासीन आत्मे आपापल्या यातना भोगतात. सहाव्या मंडलात हिंस्र पशुत्व असणारे पापात्मे तसेच घातकी आणि पाखंडी यांची जागा आहे. सातव्या मंडलात तीन प्रकारचे हिंसाचारी पापात्मे आढळतात :

अ) शेजाऱ्यांची हिंसा करणारे (जुलूमशहा, खुनी, दुसऱ्यांना दुखवणारे),

ब) स्वतःची हिंसा करणारे (आत्महत्या करणारे),

क) परमेश्वरनिर्मित विश्वाची, निसर्गाची हिंसा करणारे (पाखंडी, समलिंगी संभोग करणारे इ.).

आठव्या मंडलात सर्व प्रकारचे धोकेबाज आत्मे आहेत; आणि शेवटच्या नवव्या मंडलात (Cocytus) सर्व प्रकारचे विश्वासघातकी आत्मे आहेत.

हा तपशील–तरी त्यात हेलचा भौगोलिक तपशील नाहीच–निश्चितच फार शुष्क वाटेल. परंतु हा माझ्या निवेदनाचा दोष आहे. मुळातून वाचताना दान्तेचा हेल अतिशय जिवंतपणे आपल्यासमोर येतो. प्रवासातला प्रत्येक टप्पा, दान्ते व व्हर्जिलला दिसणारी दृश्ये, त्यांना भेटणारे आत्मे, त्यांच्यामधील संवाद, दान्तेच्या आश्चर्य, भयादी भावनांची अभिव्यक्ती आणि इतर अनेक गोष्टी दान्तेच्या ओघवत्या आणि चित्रमय शैलीमुळे विलक्षण जिवंतपणाने आपल्या मनाची पकड घेतात. निरनिराळ्या प्रायश्चित्तांची किंवा शिक्षांची योजना करताना दान्तेची कल्पनाशक्ती विलक्षण तल्लख आणि क्रूर बनते. हेलमधले सगळे भूभाग (Landscapes) देखील दान्ते फार रेखीवपणे आणि जिवंत तपशिलासह सादर करतो. ते कुठे फिकट किंवा अमूर्त होत नाहीत. उलट त्यांच्यात भावसूचकता असल्यामुळे ते अधिकच परिणामकारक बनतात. दान्ते आपल्या कथ्यविषयाची मांडणीदेखील फार पद्धतशीरपणे आणि प्रत्ययकारी तऱ्हेने करतो. त्याच्या ह्याच सामर्थ्यामुळे त्याला कधीकधी रोमँटिसिस्ट मानण्यात येते. पण आपण दान्ते हा स्कोलॅस्टिक होता हेही विसरायला नको. खरे तर, त्याची प्रतिभा ही एक नितळ आणि तरल अशा बौद्धिकतेचा आविष्कार आहे. अत्यंत कल्पकतेने आणि प्रसंगी भावविवशतेने दिलेल्या प्रायश्चित्तांकडे आपण जर काळजीपूर्वक पाहिले, तर आपल्या हे लक्षात येते, की दान्ते आपल्या शिक्षा अत्यंत काटेकोरपणे आणि बुद्धीच्या कसोटीवर आधारलेल्या नैतिक श्रेणींच्या आधाराने देत राहतो. त्याच्यासमोर विश्वव्यवस्थेचा जो आराखडा आहे, त्यात ती नेमकेपणाने बसते– वासनांनी पीडलेले आत्मे जमिनीवर, गार पावसात पडलेले असतात, क्रोधाविष्ट आत्मे परस्परांशी दलदलीत लढत असतात, आणि आत्महत्या करणाऱ्यांचे आत्मे झुडपे बनतात आणि त्यांतून धावणारे जंगली कुत्रे त्यांना रक्तबंबाळ करताना दिसतात. दान्तेच्या चित्रमय कल्पनाशक्तीच्या ह्या आणि इतर अनेक प्रतिमा या त्याच्या प्रायश्चित्तव्यवस्थेतही अनुरूपपणे बसतात हे लक्षात ठेवायला हवे.

हेल म्हणजे एका टप्प्यावरून दुसऱ्या टप्प्यावर, एका वर्तुळातून दुसऱ्या वर्तुळात असा एक रूक्ष आणि वैराण प्रवास न राहता एक अत्यंत नाटयमय आणि काव्यमय अशा प्रकारचा आध्यात्मिक स्वरूपाचा अनुभव आपल्याला प्राप्त होतो. मग हेल हे एक अनंत शक्यतांमध्ये सतत विस्तारत जाणाऱ्या दानवी शक्तींचे प्रतीक म्हणून आपल्या अनुभवाचा भाग बनते. माणसाच्या आत्म्याला ग्रासू शकणाऱ्या जवळजवळ प्रत्येक प्रकारच्या पापांची ओळख फार स्पष्टपणे आणि फार खोलपणे दान्ते आपल्याला करून देतो. त्याकरता दान्ते या पापांवर तात्त्विक किंवा धार्मिक स्वरूपाचे भाष्य करीत नाही. याउलट, अस्सल कवीला शोभेल अशा पद्धतीने इतिहासातील किंवा समकालीन जगतातील किंवा पौराणिक कथांतील युरोपीय मनाला ज्ञात असलेल्या व्यक्तींची तो निवड करतो आणि त्यांच्या आयुष्यातल्या त्या त्या पापाच्या नेमक्या घटना किंवा प्रसंग यांच्याद्वारे त्या पापाचे स्वरूप तो आपल्या अंतःकरणावर बिंबवतो. ह्या विविध व्यक्ती मग त्यांच्या (आणि




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्याही) मनातल्या प्रकट आणि सुप्त इच्छा-वासनांच्या प्रतीक म्हणून आपल्याला जाणवू लागतात. आपल्याला आपली ओळख पटायला सुरुवात होते. हेल म्हणजे दूर कुठे तरी पाप्यांच्या प्रायश्चित्तासाठी निर्माण केलेले एक यातनाघर न राहता ती एक आपली अवस्था -not a place, but a state – असल्याचे आपल्या लक्षात येते.

आपल्या आणखी असेही लक्षात येते की, हेल-मधला प्रत्येकजण ह्या तिथे स्वेच्छेने आलेला असतो. स्वत:च्या इच्छिताचा पाठपुरावा तो हेलमध्येही करत असतो. खरे तर, एका अर्थाने त्याला हवे असते तेच मिळवायचा तो अखंड प्रयत्न करत असतो. तीच त्याची यातना बनते, तेच त्याचे प्रायश्चित्तही होते. दान्तेच्या दृष्टीने स्वेच्छेलाच (व्यक्तीच्या इच्छा-शक्तीलाच) सर्व काही समजणाऱ्या व्यक्ती गहन अंधारात बुडालेल्या असतात. त्यांना परमेश्वराची–त्याच्या प्रेमस्वरूपाची जाणीवच नसते, मग त्याचा अर्थ समजावून घेण्याची आवश्यकता वाटणे तर दूरच.

या हेलचा बादशहा जो सैतान त्याचीच ही देन आहे. एके काळी देवदूत असलेला लूसिफर (Lucifer) आता पृथ्वीच्या गुरुत्वकेंद्राच्या ठिकाणी कायमचा रुतून बसलेला आहे हे लक्षात घेण्यासारखे आहे. दान्ते जणू हेच सुचवतो आहे, की Evil is lodged in the very heart of our existence.

हेलच्या शेवटच्या–नवव्या–वर्तुळात अर्धा बर्फात आणि अर्धा वर (त्याची नाभी पृथ्वीच्या गुरुत्वकेंद्राच्या ठिकाणी आहे) असा पृथ्वीच्या मध्यभागी फसलेला सैतान म्हणजे मूर्तिमंत आत्मकेंद्रित्व! परमेश्वराशी लढणाऱ्या महाकाय राक्षसांनी (Giants) घेरलेला. त्याच्या डोक्याला तीन तोंडे आहेत– समोरचे लाल, उजव्या खांद्यावरचे पिवळे आणि डावीकडचे काळे. जणू युरोपीय, आशियाई आणि आफ्रिकी खंडांवरचे म्हणजेच सर्व विश्वावरचे त्याचे स्वामित्वच त्यातून स्पष्ट होत आहे. त्याच्या प्रत्येक खांद्याला वटवाघुळा-सारखे दोन प्रचंड पंख आहेत. त्याच्या तीन जबड्यां-मध्ये तीन नीचतम विश्वासघातकी आहेत. ज्यूडास इस्कॅरियट, मार्कस ब्रूटस आणि कॅसिअस. ज्यूडास उघडच परमेश्वराशी प्रतारणा करणाऱ्याचे प्रतीक आहे. दान्तेच्या दृष्टिकोणातून ब्रूटस आणि कॅसिअस हे साम्राज्याशी प्रतारणा करणाऱ्याचे प्रतीक आहेत. कारण वरवर तरी ते दोघेही सीझरला स्वामिनिष्ठेच्या शपथेने बांधलेले होते. दान्तेच्या संकल्पनेप्रमाणे साम्राज्याशी प्रतारणा म्हणजेच ऐहिक व्यवस्थेशी प्रतारणा. याचा अर्थ असा की, ह्या तीन विश्वासघातक्यांच्या रूपाने दान्ते असेच सूचित करीत आहे, की देवाशी आणि समाजाशी प्रतारणा हा सगळ्यांत मोठा विश्वासघात असून ते नीचतम श्रेणीतले पाप आहे. सैतानाच्या भोवतीचे मघा उल्लेखिलेले महाकाय राक्षस म्हणजे अहंकाराच्या प्रतिमा आहेत. डॉरोथी सेअर्सच्या मते मानवी अंत:-करणात आणि समाजात प्रेमाचा आणि सद्बुद्धीचा लोप झाल्यानंतर ज्या आंधळ्या शक्ती थैमान घालू लागतात, त्यांच्याही ते प्रतिमा आहेत.

इन्फर्नोमधील प्रवासाच्या शेवटच्या चरणावर ह्या-प्रमाणे येऊन पोहचल्यानंतर–हेलचा असा अखेरचा तळ गाठल्यानंतर–मानवासमोर–दान्ते व्हर्जिलसमोर–मग हेल शिल्लक राहात नाही. गुरुत्वमध्याच्या पलीकडे आता परत आणखी खाली जाणे उरत नाही. आता वरच्या प्रवासाला प्रारंभ होतो. प्रवासाचा पूर्वार्ध संपला आहे आणि उत्तरार्ध, नव्हे पश्चिमार्ध प्रारंभ होतो आहे. ह्या अर्ध्यात सैतानाचा अर्धा (उलटा) भाग अजूनही आहेच, पण दान्ते तो पटकन ओलांडतो. तिथे वाहणारा एक ओढा आहे. पृथ्वीच्या उरात अजून अंधार आहे. पण प्रकाशकिरणांना प्रवेश आहे. समोर आता मोकळे आकाश येणार आहे आणि अनंत ताऱ्यांचा पट उलग-डणार आहे. व्हर्जिल आणि दान्ते पुर्गटोरिओच्या उंबरठ्यावर उभे आहेत. व्हर्जिल पुढे आणि पाठोपाठ दान्ते... पण हे त्याच्याच शब्दांत सांगितले पाहिजे :

> He first, I following, till my straining sense
> Glimpsed the bright burden of the heavenly cars
> Through a round hole, by this we climbed; and thence
> Came forth, to look once more upon the stars.
> (Inf. XXXIV, 136–139)

– ४ –

'पुर्गटोरिओ' आणि त्यानंतर 'पॅराडीझो' यांबद्दल सर्वसामान्य वाचकाला फारशी माहिती नसते.

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सर्वसाधारणपणे दान्तेला ओळखणारा वाचक त्याला The Poet of Hell म्हणूनच ओळखतो. पण असे करण्यात आपण दान्तेवर तर अन्याय करतोच, पण स्वतःवरही अन्याय करत असतो. कारण 'कॉमेडी'चा दुसरा आणि तिसरा भाग हेही तितकेच काव्यमय आणि सुंदर आहेत. 'कॉमेडी'चा समग्रपणे विचार केला, तर दान्तेला 'पोएट ऑफ हेल' मानणे ही कल्पना किती चूक आहे ते तात्काळ पटते. खरे तर, दान्ते आनंदाचा कवी आहे. त्याच्या 'हेल'मधले गुदमरून टाकणारे वातावरण आणि तिथल्या नैराश्याचा अंधकार यांना मागे सोडून दान्ते 'पुर्गटोरिओ' आणि 'पॅराडीझो'-मध्ये जेव्हा येतो तेव्हा त्याच्याबरोबर वाचकही निखळ बौद्धिक आनंदाचा आणि प्रेमाचा अनुभव घेऊ लागतो ("Pure intellectual light fulfilled with love."). (Para., XXX–40)

अर्थात हे खरे आहे, की 'पुर्गटोरिओ'त आणि 'पॅराडीझो'त प्रेम, इच्छाशक्ती किंवा आत्मा यांबद्दल बरीच धार्मिक, तात्त्विक चर्चा आहे आणि ती 'प्रवचनात्मक' वाटण्याची शक्यताही आहे. परंतु आपण हे विसरता कामा नये, की आपण एक महाकाव्य वाचतो आहोत. त्या महाकाव्याचा एकूण आवाका आणि मूळ विषयाची संदर्भचौकट हे अतिशय मोठे आहेत. शिवाय ज्या काळात दान्तेने आपले महाकाव्य लिहिले, त्या काळातल्या वाचकाला त्यात काहीच वावगे वाटत नव्हते. उलट, अशा प्रकारची चर्चा हा महाकाव्याचा (किंवा एकूण काव्याचाच) एक स्वाभाविक भाग म्हणूनच त्याकडे पाहिले जात असे. आणि क्षणभर असे गृहीत धरले, की कोरड्या तत्त्वचर्चेची कडवी त्यात नाहीत, तर मग हे भाग 'काव्य' म्हणून वाचायला 'सोपे' झाले असते का? तर त्याचे उत्तर 'मुळीच नाही' असेच द्यावे लागेल. कारण एकूणच 'कॉमेडी' ही काही एक साधी साहस-कथा किंवा भूतकथा नाही. आत्म्याच्या मरणोत्तर अवस्थांचा तो एक काव्यात्म, बौद्धिक आणि आध्यात्मिक आलेख आहे. We must rise to meet it. आणि हे तुम्हाला करावेसे वाटावे आणि ते सुकर व्हावे इतपतच नव्हे, तर शेवटी तुम्हाला निरतिशय आनंद देईल इतके काव्य-सामर्थ्य ह्या दोन भागांमध्येही आहे. डॉरोथी सेअर्स या बाबतीत जे म्हणते, त्याचा प्रत्यय आपल्याला शांतपणे हे दोन भाग वाचल्यावर येऊ शकतो. ती म्हणते,



"And in the matter of sheer artistry, the second cantica, by comparison with the first, displays a livelier invention, increased architectural skill, greater freedom of handling and technique, a smoother and more assured mastery of the verse."

(तिने 'पुर्गटोरिओ'ला कॉमेडीचा 'tenderest, subtlest and most human section' म्हणून गौरविले आहे.)

'पुर्गटोरिओ'च्या आरंभीच्या ओळीच दान्तेच्या हर्षोत्फुल्ल अंतःकरणाची साक्ष देतात. हेलमधील अंतःकरण दडपवून टाकणारे वातावरण, तिथल्या कृष्ण-छाया, उग्र दर्प, आवाज यांतून दान्ते आणि व्हर्जिल नुकतेच पर्गेटरीच्या वालुकामय किनाऱ्यावर आले आहेत. रात्र संपलेली आहे. ईस्टरच्या रविवारची सुंदर पहाट आहे. स्वच्छ सूर्यप्रकाशात न्हाऊन निघालेला पर्गेटरीचा उंचच उंच निमुळता पहाड त्यांच्यासमोर उभा आहे. नितळ आणि शांत वातावरण आणि पहाटेचा आल्हाद-दायक वारा. समोरच्या आकाशातले रंग आता गुलाबी, आता सोनेरी आणि आता निळे होताहेत. समोरच्या पूर्व क्षितिजावर शुक्र तळपतो आहे. उजवीकडे दक्षिणा-काशात चार सनातन तारे चमचमत आहेत अशा वातावरणात दान्तेच्या अंतःकरणात आनंदोल्लास दाटला असल्यास नवल नाही. ह्या वातावरणाचे सौंदर्य अधिकाधिक वाढत जाते. सातव्या कँटोत दान्तेने केलेले वर्णन पाहण्यासारखे आहे.

"Gold and fine silver, crimson and ceruse
wood yellow–lustrous, clear cerulean dye,
Indigo, fresh-cracked emerald's brilliant hues,
Matched with the foliage and the flowers that lie
Heaped in that lap, would faint, as minor faints
Beneath its major, and show dim thereby,
Here nature had not only plied her paints,






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

But had distilled, unnameable, unknown
The mingled sweetness of a thousand scents."
(Purg., VII, 73–81)

या पर्गेटरीचा रक्षक वृद्ध केटो आहे. व्हर्जिल त्याला दान्तेची ओळख करून देतो. केटो त्याच्याभोवती वेताचे एक हिरवे कडे टाकतो आणि त्यांचा पुढचा प्रवास सुरू होतो. हे हिरवे कडे म्हणजे आशेचे वलय. मुक्तिमार्गावर प्रवास करणाऱ्याला Faith, Hope and Charity ह्या त्रयीची आवश्यकता असते याचा उल्लेख मागे आलाच आहे.

'पुर्गटोरिओ'चा प्रवास म्हणजे या पर्वताच्या पायथ्यापासून सुरुवात करून त्याच्या शिखरावर असलेल्या पृथ्वीवरील स्वर्गाचा प्रवास. ह्या 'पुर्गटोरिओ'ची रचना इन्फर्नोच्या रचनेच्या तुलनेने अधिक सोपी आणि सरळ असली तरी आशयाच्या आणि सुसंबद्धतेच्या दृष्टीने अधिक समृद्ध आहे.

ह्या पर्वताच्या पायथ्याच्या दोन चट्ट्या‡ (Terraces) आहेत. त्यानंतर वर तशाच आणखी सात चट्ट्या आहेत. आणि शिखरावर जिथून ॲडमचे पतन झाले तो पृथ्वीवरील स्वर्ग– The Garden of Eden– आहे. या सात पायऱ्यांवर जी सात ख्रिश्चन महत्पापे (Seven Deadly Sins) मानली आहेत त्यांचे क्षालन होते. ही महत्पापे अशी आहेत– १. अहंकार (Pride), २. असूया (Envy), ३. क्रोध (Wrath), ४. आळस (Sloth), ५. हाव (Avarice), ६. खादाडपणा (Gluttony), ७. कामुकता (Lust).

Ante–Purgatory मध्ये जे चर्चबाहेर फेकले गेले आहेत (Excommunicate) आणि ज्यांना पश्चात्ताप फार उशिरा झाला असे आत्मे असतात. यांपैकी पहिल्या चट्टीवर चर्चबाहेर फेकलेल्यांचे आत्मे असतात. यांना या ठिकाणी त्यांच्या आयुष्याचा तीसपट काळ घालवावा लागतो. दुसऱ्या चट्टीवर दुसऱ्या प्रकारचे आत्मे असतात. यांना आपल्या आयुष्याइतका काळ इथे काढावा लागतो. Ante–Purgatory च्या शेवटी पर्गेटरीचे प्रवेशद्वार आहे. इथूनच सर्व आत्म्यांना आपल्या अनुतापाचा आणि पापक्षालनाचा प्रवास सुरू करावा लागतो. याला सेंट पीटरचे द्वार म्हणतात. या द्वारात प्रवेश करण्यासाठी पश्चात्तापाच्या तीन पायऱ्या आहेत– कबुली (Confession), आत्मक्लेश (Contrition) आणि समाधान (Satisfaction). यात येणाऱ्या प्रत्येक आत्म्याच्या कपाळावर सात 'पी' (P) कोरलेले असतात आणि एकेक चट्टी पार केली की एकेक 'पी' पुसून टाकण्यात येते. 'पी' (P) हे 'Peccata (Lat : Sin)चे आद्याक्षर आहे.

पर्गेटरीचे चित्र समोर येण्यासाठी एवढा तपशील पुरे व्हावा. त्यातील दान्तेच्या प्रवासाचा तपशील कितीही मनोवेधक असला, तरी त्याचे वर्णन स्थलाभावी इथे करता येणार नाही. मात्र 'पुर्गटोरिओ'च्या आशयाचा–कमीतकमी त्याच्या गाभ्याचा–विचार करणे अगत्याचे आहे.

सुरुवातीलाच पर्गेटरीसंबंधी प्रचलित असलेल्या दोन गैरसमजुती दूर करणे आवश्यक आहे.

१. पुष्कळदा असे मानले जाते की, पर्गेटरी म्हणजे जिथे आत्मे आपल्याला आता स्वर्ग मिळणार की नरक, याची वाट पाहत असतात असे स्थान. A kind of waiting-room for Souls. हे अर्थातच चूक आहे. पर्गेटरीत आलेले सर्वच आत्मे हे स्वर्गाच्या मार्गावर असतात. कोणी आधी पोचेल, कोणी नंतर एवढेच.

२. अशीही एक समजूत आहे, की ज्या आत्म्यांनी मृत्यूपूर्वी आपल्या पापांचा कबुलीजबाब दिला नाही त्यांच्यासाठी ही आणखी एक संधी देण्यात आलेली आहे. हेही बरोबर नाही. मरताना त्या व्यक्तीने एका बाजूला 'स्व' व दुसरीकडे परमेश्वर यांत जी निवड केलेली असते तोच तिच्यावरचा अंतिम निर्णय असतो.

पर्गेटरीतही जर आत्मे आपल्या पापाची शिक्षा भोगत असतात, आणि इन्फर्नोही जर पापाची शिक्षा मिळण्याचे ठिकाण आहे, तर या दोहोंत फरक काय? असा प्रश्न पडणे स्वाभाविक आहे.

परंतु फरक महत्त्वाचा आणि मूलभूत स्वरूपाचा आहे. इन्फर्नोमधील आत्मे त्यांनी स्वेच्छेने निवडलेल्या

‡ बद्रिनाथ, केदारनाथ इ. हिमालयातील स्थानांकडे जाताना पर्वतावर मधून मधून साधारण सपाट जागेवर यात्रेकरूंच्या विश्रामासाठी ज्या जागा आढळतात त्यांना 'चट्टी' म्हणतात.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या पापाचरणाचे परिणाम भोगत असतात. त्यांनी केलेल्या पापकृत्यांची शिक्षा ते भोगत असतात. पर्गेटरीचे प्रयोजन मुख्यत: पश्चात्तापदग्ध पापात्म्यांच्या पापकलंकाचे क्षालन करण्यासाठी आहे. माणूस पुष्कळदा एखादे पापकृत्य करत नाही; फक्त त्याच्या मनाचा कल पापाकडे असतो. त्याच्या विवेकबुद्धीला न जुमानता मनात पाप उभे राहते. माणूस मुळातच अपूर्ण असल्यामुळे अशा प्रकारे मनात पाप येणे अटळ असते. मनाचे हे पापीपण (Stain of sinfulness) धुऊन काढणे हेच या पर्गेटरीतल्या पश्चात्तापदग्ध आत्म्यांच्या प्रायश्चित्तांचे उद्दिष्ट आहे. हीच गोष्ट डॉरोथी सेअर्सने अतिशय मार्मिक शब्दांत मांडलेली आहे. ती म्हणते,

"Hell is concerned with the fruits, but Purgatory with the roots of sin." (Purgatory, Introduction, P. 15)

पुर्गटोरिओ म्हणजे इन्फर्नोची सुधारित आवृत्ती नाही. किंवा इन्फर्नो म्हणजे सक्तमजुरीची शिक्षा भोगणाऱ्या गुन्हेगारांचा कठोर तुरुंग आणि पुर्गटोरिओ म्हणजे रिफर्मेटरी स्कूल असाही प्रकार नाही. इन्फर्नो आणि पुर्गटोरिओ यांमधील यातनांमध्ये तसा फारसा फरक नाही. इन्फर्नोतील ढोंगी हे जसे सोन्या-जस्ताच्या ओझ्याखाली वाकलेले आहेत (कँटो XXIII) तसेच पुर्गटोरिओतील पश्चात्तापदग्ध अहंकारीदेखील प्रचंड दगडांच्या जोखडाखाली वाकलेले आहेत (कँटो X). पुर्गटोरिओतील कामपीडित जसे अग्निज्वालांमध्ये जळत आहेत (कँटो XXVI) तसेच इन्फर्नोमधील पाखंडी (Heretics) हेसुद्धा थडग्यांमध्ये जळत आहेत.

इन्फर्नो व पुर्गटोरिओ या दोहोंत जो फरक आहे तो त्यात जे पापात्मे शिक्षा भोगत आहेत त्यांच्या मनोवृत्तीचा– आपल्या शिक्षेकडे पाहण्याच्या त्यांच्या दृष्टिकोणाचा. आजच्या न्यायशास्त्रातील आणि मानसशास्त्रातील एक महत्त्वाचा सिद्धांत असा आहे की, गुन्हेगाराला सुधारायचे असेल, तर त्याला आपल्या गुन्ह्याची शिक्षा मनापासून स्वीकारायला प्रवृत्त केले पाहिजे. माणसाला एकदा आपण गुन्हा केला आहे आणि तो गुन्हा आहे आणि आपण हे करायला नको होते हे मनापासून पटले, तर आपल्या शिक्षेचा स्वीकार तो मनापासून करतो. आणि अशा प्रकारची शिक्षा त्याच्या सुधारणेला कारणीभूत होते. अशा प्रकारे शिक्षा जिथे रास्त वाटत नाही, म्हणजे आपण तिला खरोखरच पात्र आहोत असे जिथे गुन्हेगाराला मनापासून वाटत नाही, तिथे ती शिक्षा एक ओझे वाटते, नकोशी वाटते– 'शिक्षा' वाटते. आपल्यावर अन्याय झालेला आहे असे गुन्हेगाराला वाटत राहते.

इन्फर्नोत असणाऱ्या पापात्म्याला फक्त आपल्या 'स्व'ची इच्छा आणि तिची तृप्ती एवढेच एक सत्य ठाऊक असते. 'स्वे'तर जग– विशेषत: सद्‌गुणांचे, पावित्र्याचे जग– त्याला दाहक वाटते. या पवित्र जगाचा दाह पुर्गटोरिओतल्या पश्चात्तापी पापात्म्याला स्वागतार्ह वाटतो. कारण ह्या ज्वाला त्याला शुद्ध करणार असतात; त्याचा पापकलंक पुसून टाकणार असतात अशी त्याची मनोमन खात्री असते.

दान्तेच्या दृष्टीने हेल म्हणजे 'स्व'च्या जखडणाऱ्या तुरुंगात अधिकाधिक खोल रुतत जाणे. मागे म्हटल्याप्रमाणे अशी व्यक्ती आपल्या यातनास्थानाचा शोध घेत तिथे पोचत असते. इन्फर्नोत दान्ते म्हणतो,

"They press to pass the river, for the fire
Of heavenly justice stings and spurs them so
That all their fear is changed into desire;
(Inf. III, 124–126)

पुर्गटोरिओत या 'स्व'च्या तुरुंगाचे लोखंडी गज जाणीवपूर्वक तोडण्याचा प्रयत्न असतो–मग त्याची कितीही किंमत द्यावी लागली तरी हरकत नाही. कारण ह्या आत्म्याचे लक्ष मुक्तीकडे लागलेले असते. पुर्गटोरिओत दान्ते म्हणतो त्याप्रमाणे,

" ..... heavenly justice keeps desire
set toward the pain as once it was toward the sin
(Purg XXI, 65-66)

परमेश्वरी न्याय दोन्ही ठिकाणी समान आहे. फरक आहे तो फक्त पापी आत्मा तो न्याय स्वीकारतो, की नाकारतो एवढाच.

या भूमिकेच्या मागे कॅथलिक ख्रिश्चनांची– म्हणजेच दान्तेची– जी मनुष्याबद्दलची धारणा आहे तिचा उल्लेख करणे इष्ट ठरेल. या धारणेबद्दल आज अनेक







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लोक मानतात त्याप्रमाणे मनुष्य हा काही परिस्थितीचा किंकर नाही किंवा तो परमेश्वराच्या (किंवा दैवाच्या) हातातले बाहुले नाही. माणसाला नियतीच्या हातातले हतबल खेळणे मानले, म्हणजे नैतिक मूल्यांना किंवा त्यानुसार मिळणाऱ्या शिक्षेला किंवा पारितोषिकाला अर्थच उरत नाही. दान्तेला मानवाबद्दलचा हा दृष्टिकोण उघडच अमान्य आहे. मनुष्य हा स्वतंत्र इच्छाशक्ती असलेला जबाबदार प्राणी आहे अशा स्वरूपाची ही धारणा आहे. म्हणूनच पुर्गटोरिओत स्वतंत्र इच्छाशक्तीवर ( Free will ) आपल्याला तथाकथित ' प्रवचने ' आढळतात.†

दान्तेच्या पर्गेटरीतील सगळ्या नैतिक मूल्यश्रेणी ॲरिस्टॉटल आणि सेंट टॉमस ॲक्विनस यांच्या तत्त्वज्ञानावर आधारलेल्या आहेत. या तत्त्वज्ञानाच्या मुळाशी असलेली संकल्पनाच दान्तेच्या पर्गेटरीतील पापक्षालनाच्या रचनेमागे आहे ती संकल्पना अशी की, या विश्वात 'दुष्ट प्रवृत्ती ' ( Evil ) अशी गोष्ट अस्तित्वातच नाही. त्याचे स्वतंत्र अस्तित्व तर नाहीच पण त्यातून दुसरेही काही स्वतंत्र निर्माण होऊ शकत नाही. परमेश्वराने फक्त सत् ( Good ) निर्माण केले आहे आणि असत् ( Evil ) हे फक्त या सत्च्याच आधाराने– सत्चेच बांडगूळ म्हणून राहू शकते.

आपल्याला आवडते त्याच्यावर प्रेम करण्याची सहजप्रवृत्ती माणसाच्या ठायी परमेश्वराने निर्माण केलेली आहे. सर्व सद्गुणांचे मूळ हीच सहजप्रेरणा आहे. पण ह्या सहजप्रेरणेला वेगवेगळी वळणे मिळू शकतात. एक, ती विकृत बनू शकते. दोन, ती दुर्बल बनू शकते. तीन, ती चुकीच्या मार्गाने जाऊ शकते. ह्या तिन्ही प्रकारांतून ' दुर्गुण ' (Vice) निर्माण होत असतात. सर्व दुर्गुणांचे मूळ हे प्रेमाच्या विरूपात आहे. प्रेम विकृत झाले तर, किंवा प्रेम अपुरे असेल तर किंवा प्रेमाचा अतिरेक झाला तर ते प्रेम दुर्गुणाला कारणीभूत होते.

त्यानुसार दान्तेच्या पर्गेटरीच्या खालच्या भागात –म्हणजे पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या चट्टयांवर–जे आत्मे आहेत ते या विकृत प्रेमाचे बळी आहेत. पैकी पहिल्या चट्टीवर अहंकाराने (Pride) ग्रासलेले आत्मे आहेत (अहंकारातून म्हणजे आत्मप्रेमातून दुसऱ्याबद्दलचा द्वेष आणि तिरस्कार निर्माण होतो ). दुसऱ्या चट्टीवर असूयाग्रस्त (Envy) आत्मे आढळतात (स्वतःला हव्या असणाऱ्या वस्तूंच्या/व्यक्तींच्या प्रेमापोटी दुसऱ्याच्या वस्तू/व्यक्ती हिरावून घेण्याची प्रवृत्ती जन्मते. ). तिसऱ्या चट्टीवर क्रोधाचे बळी आहेत (न्यायाबद्दलच्या प्रेमातूनच सूडाच्या भावनेचा जन्म होतो ).

पर्गेटरीतल्या मधल्या चट्टीवर, म्हणजे चवथ्या चट्टीवर आळसग्रस्त (Sloth) आत्मे आहेत. हा दुर्गुण अपुऱ्या प्रेमातून निर्माण होतो (ह्यांना कोणत्याच गोष्टीबद्दल प्रेम नसते.). पर्गेटरीतल्या वरच्या तीन चट्टयांवर प्रेमातिरेकाचे बळी आढळतात.

पाचव्या चट्टीवर अती हाव (Avarice/Covetousness) असणारे आत्मे आहेत (पैसा किंवा सत्ता यांचे अतिरेकी प्रेम).

सहाव्या चट्टीवर अधाशी (Gluttony) आत्मे आहेत (सर्वच प्रकारच्या ऐंद्रिय सुखाचे अतिरेकी प्रेम. ).

आणि सातव्या चट्टीवर कामपीडित (Lust) आत्मे आढळतात (व्यक्तीवरचे अतिरेकी प्रेम).

प्रत्येक चट्टीवर आढळणाऱ्या आत्म्यांच्या पश्चात्तापाचे आणि प्रायश्चित्ताचे स्वरूप दान्तेने एका विशिष्ट पद्धतीने स्पष्ट केलेले आहे :

१) प्रायश्चित्त (Penance), २) ध्यान (Meditation), ३) प्रार्थना (Prayer), ४) कृपाशीर्वाद/कृपाप्रसाद (Benediction), ५) चट्टीचा देवदूत (Angel of the Terrace).

थोडक्यात ह्याचे स्पष्टीकरण द्यायचे झाले, तर असे म्हणावे लागेल की, प्रत्येक चट्टीवर आपल्याला पापात्मे आपली अनुरूप शिक्षा भोगत असलेले दिसतात. काही ठिकाणी ही शिक्षा त्यांनी केलेल्या पापाच्याच स्वरूपाची असते. उदाहरणार्थ, दुसऱ्या चट्टीवरचे असूयाग्रस्त आत्मे काही पाहू शकत नाहीत कारण त्यांचे डोळे शिवून टाकलेले आहेत. आपल्या आयुष्यात त्यांना दुसऱ्याचे सुख पाहवले नव्हते हे लक्षात घेतले, म्हणजे त्यांचे प्रायश्चित्त हे त्यांच्या पापाच्याच स्वरूपाचे आहे हे लक्षात येईल. याउलट, काही ठिकाणी पापात्म्यांच्या प्रायश्चित्ताचे स्वरूप त्यांच्या पापाला अनुरूप अशा सद्गुणाचे असते. उदाहरणार्थ, चवथ्या चट्टीवरच्या

† (स्वतंत्र इच्छाशक्तीबरोबरच दान्तेच्या तत्त्वज्ञानात Grace, Mercy, Pity ( कृपा, दया, करुणा) यांनाही महत्त्वाचे स्थान आहे, हे या ठिकाणी विसरता कामा नये.)

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

आळशी पापात्म्यांची शिक्षा सतत धावत राहणे ही आहे. काही ठिकाणी (उदा., चट्टी सात) पापात्म्यांना दोन्ही प्रकारचे प्रायश्चित्त भोगावे लागते.

प्रत्येक चट्टीवर आढळणाऱ्या दृश्यांमधले हे सर्व घटक ख्रिश्चन धर्माच्या पापक्षालनाच्या संकल्पनेशी (आणि त्याच्या चर्चमधल्या विधींशी) सुसंगतच आहेत हे वेगळे सांगायची आवश्यकता नाही.

अशा प्रकारे सर्व पापांचे क्षालन होऊन चढत चढत जेव्हा आत्मा ह्या पर्गेटरीच्या शिखरावर येतो तेव्हा तो पृथ्वीवरील स्वर्गात आलेला असतो. जेथून त्याचे पतन झाले त्या Garden of Eden मध्ये तो येऊन पोचतो. तो निष्पाप बनतो.

पतनापूर्वी तो ज्या प्रकारे निष्पाप होता तसाच तो आताही होतो. पण आता त्याच्यापाशी काहीतरी अधिक आहे. नुसते त्याचे पाप धुऊन निघाले आहे असे नाही, तर पर्गेटरीत प्रत्येक पायरीवर त्याला परमेश्वरी कृपेचा लाभ झालेला आहे. आता तो सर्वार्थाने 'सिद्ध' झालेला आहे. सत्ताविसाव्या कँटोच्या शेवटी त्यांचा मार्गदर्शक व्हर्जिल त्याचा निरोप घेताना जे म्हणतो ते अगदी यथार्थ आहे :

> No word from me, no further sign expect;
> Free, upright, whole thy will henceforth lays down
> Guidance that it were error to neglect,
> Whence o'er thyself I mitre thee and crown.

(कॉमेडीचा नायक दान्तेचा विचार केला तर ह्या कृपाप्रसादाची जननी बिॲट्रिस आहे हे लक्षात येईल. कॉमेडीचा वाचक अर्थातच ही गोष्ट नजरेआड करू शकत नाही.)

हा पृथ्वीवरील स्वर्ग म्हणजे भौतिक आणि ऐहिक परिपूर्णतेचे प्रतीक आहे. हा दान्तेच्या महायात्रेचा शेवट नाही, आरंभ आहे. आता त्याच्या स्वागताला आपल्या अलौकिक ऐश्वर्यात बिॲट्रिस आली आहे आणि इथून पुढच्या-परमेश्वराच्या स्वर्गाच्या-प्रवासाला सुरुवात होत आहे.

— ५ —

दान्तेबरोबर त्याच्या पॅराडीझोचा प्रवास सुरू करण्यापूर्वी तो त्यातल्या दुसऱ्या कँटोच्या आरंभी जो इशारा देतो आहे त्याकडे लक्ष वेधणे आवश्यक आहे. वाचकाला उद्देशून तो म्हणतो,

> " O you that follow in light cockle- shells
> For the song's sake, my ship that sails before,
> Carving her course and singing as she sails,
> Turn back and seek the safety of the shore " (Para II, 1-4)

कारण या महासागरात मी कुठे गडप होईन ते तुम्हाला कळणार नाही आणि तुम्ही स्वतःपण गडप व्हाल. (लक्षात ठेवा),

" Oceans as yet undared my vessel dares, " ( P. II, 7 )

स्वतः दान्ते या प्रवासाच्या अगदी सुरुवातीलाच गोंधळून गेलेला, भांबावलेला आपल्याला दिसतो. आपण पृथ्वीवरील स्वर्गातून चंद्रमंडळात कसे येऊन पोचलो हे त्याला कळत नाही. सुरुवातीलाच नव्हे, तर पुढेही दान्ते या प्रवासात वेळोवेळी निरनिराळ्या कारणांनी अस्वस्थ होत राहतो.

ही जिथे कृपापात्र दान्तेची अवस्था होते, तिथे वाचकाला हा प्रवास किती दुष्कर वाटत असेल याची कल्पनाच केलेली बरी. शैलीचा अपवाद सोडला, तर अनेक मोठमोठ्या समीक्षकांनी पॅराडीझोबद्दल—त्याच्या कंटाळवाणेपणाबद्दल, त्याच्या दुर्बोधतेबद्दल, त्याच्या अगम्यतेबद्दल—प्रतिकूल अभिप्रायच व्यक्त केलेला आहे.

दान्तेने अतिशय प्रभावित झालेल्या टी. एस्. एलिअटसारख्या मोठ्या कविसमीक्षकालाही पॅराडीझोने बरेच कष्ट दिले आहेत. एलिअटला पॅराडीझोचे श्रेष्ठत्व पटलेले असले, तरी त्याविषयीचे त्याचे पुढील उद्गार वस्तुस्थितिदायक आहेत असे म्हटले पाहिजे :

" The Purgatorio here and there might be called 'dry'; the paradiso is never dry; it is either incomprehensible or intensely exciting." ( Selected Essays, P. 264 ).

सामान्य रसिकालाच नव्हे, तर थोर समीक्षकांनाही पॅराडिझो अगम्य वाटतो याचे प्रमुख कारण त्याचा आशय आहे. एक तर स्वर्गाला काव्यविषय








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करून त्याचे समग्र चित्रण करण्याची परंपरा पाश्चिमात्य वाङ्मयात नाही. नाही म्हणायला मिल्टनचा पॅरडाईझ आहे. पण त्यात लढाया आणि वाद यांवरच आपले लक्ष केंद्रित होते. स्वर्गाची सुंदर वर्णने त्यात नाहीत असे नाही, पण ती तुरळक. स्वर्गीय आनंदाचे आणि चिरंतन सौख्याचे संपूर्ण दर्शन आपल्याला त्यात मिळत नाही. खरे तर, अलौकिक स्वर्गाला प्रत्ययकारकपणे समूर्त करण्याचे दान्तेचे प्रतिभासामर्थ्य पाश्चिमात्य वाङ्मयात केवळ अभूतपूर्व आहे असे म्हणावे लागेल.

दुसरे असे की, इन्फर्नो आणि पुर्गटोरिओप्रमाणे पॅराडीझोमध्ये ' प्रसंग ' नाहीत. ते episodic नाही. प्रसंग आणि व्यक्तिचित्रण यांमुळे निवेदनात एक वैचित्र्य निर्माण होऊ शकते. त्यात विविधता आणि रोचकता येऊ शकते. पॅराडीझोत असे काहीच नाही. त्यात व्यक्ती किंवा पात्रे आहेत; पण ती हाडामांसाची नसून फारच विरल आणि तरलपणे आपल्याला जाणवतात. चंद्रमंडळातील रहिवासी स्वच्छ पाण्यातील धूसर प्रतिबिंबांसारखे भासतात; तर बुधलोकातील निवासी क्षणभरच आपल्यासमोर चमकून जातात. त्याच्या पलीकडच्या स्वर्गलोकातील मंडळी ही तर लुप्तप्रायच असतात. एलिअटच्या शब्दांत ती ' fundamentally monotonous variations of insipia blessedness ' अशी आहेत (तरी लगोलग एलिअट पुढे म्हणतो की, ' The paradiso is not monotonous. ' ( Selected Essays, p. 264 ) अशा आश्वासक शब्दांच्याच आधारावर रसिक वाचक पॅराडीझोच्या महासागरात दान्तेच्या पाठोपाठ जायला तयार होतो).

पॅराडीझोमध्ये रसिक वाचक रस घेऊ न शकण्याचे आणखी एक कारण एलिअटने दिले आहे ते विचार करण्यासारखे आहे. त्याच्या मते सामान्यपणे रसिकांमध्ये असा एक पूर्वग्रह आहे की, खरे किंवा चांगले वाङ्मय हे फक्त शोकात्मच असू शकते. हा पूर्वग्रह शेलीच्या Our sweetest songs are those that tell of saddest thought या ओळीमुळे फार दृढ आणि लोकप्रिय झाला आहे. त्यामुळे आनंद–अगदी स्वर्गीय आनंददेखील–हा काव्यविषय होऊ शकतो हेच मुळात काहीसे अस्वीकार्य वाटते. या ठिकाणी शॉने जे म्हटले, की Heaven is a most angelically dull place त्याची आठवण व्हावी (त्याच्या Man and Superman मध्ये मोझार्ट स्वर्गाला कंटाळून नरकात फेरफटका मारण्यासाठी येतो असे दाखविले आहे याचे स्मरण व्हावे). एका प्रकाशमंडळातून दुसऱ्या प्रकाशमंडळात उत्तरोत्तर अधिकाधिक तेजोमय वातावरणात सतत जात राहणे हे पॅराडीझोच्या वाचकाला फारसे सुसह्य न वाटणे स्वाभाविक आहे.*

परंतु आनंद, विशेषतः स्वर्गसुख, हा काव्याचा विषय होऊ शकतो असे मानणाऱ्या रसिक भारतीयालाही, मला वाटते, पॅराडीझो एकदम भावणार नाही. त्याचे कारण असे की पॅराडीझोतील स्वर्गाच्या रचनेच्या मुळाशी असलेली बौद्धिकता दान्तेच्या प्रतिभेच्या भावनात्मक उन्मेषांतही पूर्णपणे पुसली जात नाही. ती सतत जाणवत राहते आणि मला वाटते याच कारणासाठी पॅराडीझोसंबंधी एक प्रश्न नेहमी समोर येतो. त्या प्रश्नाला बार्बरा रेनल्ड्सने आपल्या पॅराडीझोच्या प्रस्तावनेत वाचा फोडली आहे. तिच्याच शब्दांत तो प्रश्न मांडून आपण पुढे जाऊ या :

"............But the really tantalizing problem which the *Paradiso* presents is the extent to which it symbolizes Dante's own intellectual and spiritual development. Does the Beatific vision in the last Canto represent a mystical experience which Dante himself underwent, or is it only a symbol, intellectually arrived at, of the relationship between man's under-

* हा एलिअटचा मुद्दा पाश्चिमात्य परंपरेच्या संदर्भात आणि आधुनिक युरोपीय मनस्कतेच्या संदर्भात पटण्यासारखा वाटला तरी तो फक्त त्याच संदर्भापुरता मर्यादित मानणे इष्ट ठरेल. कारण 'आनंदा'ला काव्यविषय करणे आणि त्यात रमून जाणे, दंग होणे व ब्रह्मानंदी टाळी लागणे याची एक मोठी आणि सुंदर परंपरा भारतात आहे, याचे आपण भान ठेवले पाहिजे. अर्थात युरोपीय मनस्कतेत फार बुडून गेलेल्या आधुनिक भारतीयांना एलिअटचेच म्हणणे अधिक खरे वाटण्याचा संभव नाकारता येत नाही. या प्रकारच्या वादाच्या मुळाशी दोन भिन्न जीवनदृष्टी अभिप्रेत आहेत हे सुज्ञ वाचकास चटकन जाणवेल.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

standing and divine revelation ?........ How far, in other words, is the *Paradiso* a record of personal experience as well as a communication, in imagined form, of personal convictions ?" ( Paradiso Intro. PP. 13–14 ).

या प्रश्नाचे उत्तर प्रत्येकजण वेगवेगळ्या प्रकारे देईल यात शंका नाही. या आणि तत्सम इतर कारणांसाठी पॅराडीझोचा प्रवास हा कितीही दुष्कर असला आणि दान्तेने आपल्याला काठावरच थांबवण्याचा इशारा केला असला तरी त्याला आता आपण आरंभ केला पाहिजे.

ह्या पॅरडाइझ मध्ये एककेंद्री नऊ तेजोमंडले आहेत आणि ही सर्व शेवटच्या एम्पीरिअनमध्ये सामावलेली आहेत. प्रत्येक मंडळात आध्यात्मिक सिद्धीच्या निरनिराळ्या अवस्थांमधील व्यक्ती आहेत आणि त्यांची योजना त्यांच्या सिद्धीच्या चढत्या श्रेणीत आहे.

या ठिकाणी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवायला हवी. इन्फर्नो किंवा पर्गेटरीमध्ये निरनिराळ्या मंडलांवर जी माणसे आढळतात त्यांचे वास्तव्य तिथेच असते. पण पॅरडाइझमधल्या निरनिराळ्या तेजोमंडळात आढळणाऱ्या आत्म्यांचे वास्तव्य प्रत्यक्षात तिथे नसते. त्यांचे खरे वास्तव्य आहे ते दिक्कालापलीकडच्या एम्पीरिअनमध्ये इतर सर्व कृपाप्राप्त मुक्तात्म्यांसमवेत दैवी शुभ्र गुलाबपुष्पात. त्यांचे निरनिराळ्या नभोमंडळातले 'अस्तित्व' हे केवळ दान्तेला त्यांच्या भिन्न सिद्धावस्थांचे आकलन व्हावे म्हणून केलेली योजना आहे. चवथ्या कँटोत बिॲट्रिस म्हणते,

They're shown thee here, not that they here reside,
Allotted to this sphere, their heavenly mansion,
Being least exalted, is thus signified.
( Para IV, 37–39)

परंतु ते सर्व संपूर्ण ( Perfect ) परफेक्ट आहेत, त्यांची आध्यात्मिक कोटी एकच आहे आणि परमेश्वरी कृपेचा त्यांना सारखाच लाभ झालेला आहे.

एकाच वेळी हे आत्मे निरनिराळ्या अवस्थांमध्ये आणि एकाच समान अवस्थेत कसे असू शकतात, हे वाटते तितके कठीण गूढ नाही. एक तर त्यांचे निरनिराळ्या नभोमंडळांतले अस्तित्व हे केवळ आभासात्मक आहे. दुसरे असे, की प्रत्येक व्यक्तीची 'पात्र'ता ही वेगवेगळी असली, तरी त्याच्या पात्रातले परमेश्वराचे कृपातीर्थ तेच आहे. कुणीतरी पाश्चात्त्याने दिलेले उदाहरण सांगायचे झाले, तर एखाद्या पित्याने जर आपल्या मुलांना एकाच सुवर्णवस्त्राचे कपडे केले, तर प्रत्येकच मूल सारख्याच तेजाने झळाळेल. त्यांच्या वेगळेपणाला या संदर्भात काही अर्थ उरत नाही. शिवाय, पित्याला ते सर्वच सारखेच 'जवळचे' असतात. हे सर्व आत्मे परमेश्वराच्या साक्षात्काराने सारखेच पुनीत झालेले आहेत.

दान्तेचा पॅराडीझोमधला संपूर्ण प्रवास हा बिॲट्रिसच्या मार्गदर्शनाखाली होतो. पृथ्वीवरील स्वर्गात बिॲट्रिस त्याला दर्शन देते. तिथेच तो तिच्याकडे पाहात असताना तिचे लक्ष सूर्याकडे केंद्रित झाल्याचे त्याच्या लक्षात येते. तोही सूर्याकडे दृष्टी वळवतो. पण त्या प्रकाशात त्याचे डोळे क्षणभर दिपून जातात. पण लवकरच त्याची दृष्टी त्या प्रकाशाला सरावते. तो परत बिॲट्रिसकडे पाहतो. आता त्याला ग्रहमंडळाचे संगीत ऐकू येऊ लागते आणि क्षणात त्याला आपल्याभोवती प्रकाशाचा महासागर विस्तारत असल्याचे जाणवते. बिॲट्रिस त्याला सांगते, की आपण आता चंद्रमंडळावर येऊन पोचलो आहोत. इथून पुढच्या सर्व प्रवासात ही प्रकाशाची प्रतिमासृष्टी आपल्या समोर अधिकाधिक सघन आणि सुंदर होत जाते. इन्फर्नो अंधकारमय होता, पर्गेटरीत छायाप्रकाशांची साथ होती, पॅरडाइझमध्ये निखळ, सुंदर, आनंददायी प्रकाश आहे.

चंद्रमंडळ हे पृथ्वीच्या सर्वांत जवळचे. चंद्र हा आत्म्यातील अस्थिर प्रवृत्तीचे प्रतीक आहे. आपली निष्ठा ज्यांना पणाला लावता आली नाही, अशांच्यासाठी चंद्रलोकात स्थान आहे. पिकार्डा ( Picarda dei Donati ) आणि कॉन्स्टन्झा ( Constanza ) ह्यांच्या उदाहरणांतून दान्ते हेच सूचित करीत आहे. दोघांनाही आपली धर्मनिष्ठा निग्रहाने टिकवून ठेवता आली नव्हती आणि त्या दबावाला बळी पडल्या होत्या. इथले आत्मे सर्वांत खालच्या स्वर्गमंडळांत असले तरी ते संतुष्ट आहेत, तृप्त आहेत. पिकार्डा म्हणते त्याप्रमाणे येथील सर्वांनाच "His will is our peace." (Para III, 85) असे वाटते.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इथे आणखी एक गोष्ट नमूद करावीशी वाटते. ह्या स्वर्गमंडलाच्या प्रवासात पूर्वीप्रमाणेच प्रत्येक मंडलावर दान्तेला निरनिराळ्या प्रकारचे आत्मे भेटतात आणि निरनिराळे प्रश्न पडतात. प्रत्येकच मंडलावर दान्ते आणि बिॲट्रिस यांच्यात आत्म्याच्या प्रवासाबद्दल आणि विश्वरचनेबद्दल संवाद होत राहतात. आणि त्यांतूनच दान्तेच्या ( आणि आपल्याही ) ज्ञानाच्या कक्षा सतत विस्तारत जातात. प्रकाशाच्या प्रतिमा-सृष्टीचे प्रयोजन म्हणूनच अतिशय सार्थ व समर्पक वाटते. या निवेदनात अर्थातच या चर्चेचा तपशीलच काय पण साधा गोषवाराही देता येणे शक्य नाही. फक्त महत्त्वाच्या उल्लेखांवरच मला (आणि आपल्यालाही) समाधान मानणे भाग आहे.

एखाद्या बाणासारखे दान्ते आणि बिॲट्रिस आता दुसऱ्या स्वर्गमंडलात येऊन पोचतात. हे मंडल म्हणजे बुधलोक. प्रकाशात न्हाऊन निघालेले सहस्रावधी आत्मे त्यांच्यापाशी येतात. बिॲट्रिसच्या सांगण्यावरून दान्ते त्यांच्यापैकी एकाशी बोलू लागतो. पृथ्वीवर फार मोठ्या जबाबदाऱ्या पेलणारे आणि नेतृत्व करणाऱ्यांचे हे आत्मे आहेत. यांनी मानवतेची सेवा केली. अनेक सत्कृत्ये केली. आणि एकूण सदाचारी आयुष्य घालविले असले, तरी त्यांच्यात एक त्रुटी होती. ती म्हणजे त्यांनी ऐहिक महत्त्वाकांक्षा आणि लोकेषणा सोडली नाही.

एका मंडलातून दुसऱ्या मंडलात आल्यानंतर दान्तेला बिॲट्रिस अधिकाधिक सुंदर होत जाताना दिसते. बुधलोकातून शुक्रलोकात येताना दान्तेला याचा प्रत्यय येतो. या तिसऱ्या स्वर्गमंडलात ज्यांच्या अंतःकरणात खूप प्रेम आहे पण ज्यांनी या प्रेमाचा अतिरेक केला अशांचे आत्मे आहेत. त्यांच्या प्रेमाला वेडाचे स्वरूप आले होते. आपल्या सहजप्रेरणांना आपल्या इच्छाशक्तीने आळा न घालता येऊ शकणाऱ्यांचे, मोहवश होणाऱ्यांचे शुक्रग्रह प्रतीक आहेच. दान्तेची प्रत्येक ग्रहावरच्या आत्म्यांची निवड हीदेखील त्या ग्रहांबद्दलच्या ज्या समजुती आहेत त्यांच्याशी अनुरूप आहे हेही लक्षणीय आहे.

या ठिकाणी हेही लक्षात घेतले पाहिजे, की ह्या स्वर्गमंडलाच्या प्रवासाला एक नैतिकतेचाही आयाम दान्ते देत राहतो. वरील तिन्ही ग्रह हे खगोलशास्त्राच्या दृष्टीने पृथ्वीच्या छायेत येतात आणि म्हणूनच त्यांच्यात पृथ्वीवरील अपूर्णतेचा अंश आपल्याला आढळतो. हीच अपूर्णता तेथे वास करणाऱ्या आत्म्यांमध्ये आपल्याला दिसते. येथील आत्मे हे धार्मिक नीतिमत्तेप्रमाणे Faith, Hope and Charity ( Love ) या सद्‌गुणांचे आचरण करणारे होते, पण त्यांच्या आचरणात नैतिक अपूर्णता असल्यामुळे त्यांना ह्या खालच्या ( म्हणजे परमेश्वराच्या एम्पीरिअनच्या संदर्भात) मंडलात स्थान मिळाले आहे.

इथून पुढची तीन स्वर्गमंडले पृथ्वीवर ज्यांनी आपल्या कर्तृत्वाने पूर्णत्व प्राप्त केले अशा महान व्यक्तींच्या आत्म्यांची आहेत.

शुक्रमंडलातून दान्ते आणि बिॲट्रिस सूर्यमंडलात येतात. सूर्य हे बौद्धिक ज्ञानाचे आणि अंतिमतः परमेश्वराच्या ज्ञानाचे प्रतीक आहे, हे उघड आहे. सूर्याच्या तेजाच्या पार्श्वभूमीवर दान्तेला ज्या आत्म्यांचे दर्शन होते ते ' ज्ञाते ' ( Wise ) आहेत.

बारा तेजोगोलांचे एक वलय तयार करून ते दान्ते आणि बिॲट्रिसभोवती तीन प्रदक्षिणा घालतात आणि अवर्णनीय असे स्वर्गीय गान सुरू करतात. त्यातलाच एक सेंट टॉमस ॲक्विनास दान्तेला इतरांची ओळख करून देतो. त्यांपैकी सॉलोमन सोडला तर बाकीचे आत्मे हे सर्वार्थाने ज्ञात्यांचे आत्मे आहेत (सॉलोमन हा राजकीय शहाणपण सुचवतो.). ते तत्त्वज्ञ आहेत, धर्मवेत्ते आहेत. त्यांच्याच माध्यमातून परमेश्वराचे ज्ञान इतर मर्त्यांपर्यंत पोचते. परमेश्वराविषयीचे सर्व ज्ञान आणि परमेश्वराचे निरनिराळ्या प्रकारचे झालेले आकलन हे सर्व शेवटी एका अलौकिक, आनंदमय सुसंवादात गुंफलेले कसे आहे याचे हे बारा तेजोगोलांचे स्वर्गीय नृत्यगान प्रतीक आहे. (सेंट टॉमस ॲक्विनासचा Summa Theologiae हा ग्रंथ म्हणजे सर्व उपलब्ध ज्ञानाचे भांडार समजले जात असे आणि दान्तेवर त्याचा फार मोठा प्रभाव पडला आहे याचे या ठिकाणी स्मरण करून देणे इष्ट होईल.)

स्वर्गमंडलातून जरी दान्तेचे भ्रमण होत असले, तरी निरनिराळ्या संदर्भात पृथ्वीवरील–विशेषतः त्याच्या इटालीतील आणि फ्लॉरेन्समधील घटनांची–योग्य ती दखल तो घेत राहतो. सूर्यमंडलात असतानाच अकराव्या कँटोच्या आरंभी तो फ्लॉरेन्समधील काही प्रवृत्तींची निर्भर्त्सना करताना आपल्याला दिसतो. ज्ञानाचे खरे उद्दिष्ट विसरणाऱ्याविषयी तो अतिशय तिरस्काराने म्हणतो,


मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" O imbecile ambition of mortality :
What ill-directed reasonings
syllogistical
Weight down thy wings to mundane
triviality
Chasing juridical or aphoristical
Successes church preferments,
domination
By any methods brutal or
sophistical
One bent on commerce, one on
spoilation
Another fagging at his carnal
pleasure
Entoiled, one sprawled in idle
dissipation–"
(Para XI, 1–9)

सेंट टॉमस ॲक्विनासने आपल्या तत्त्वज्ञानाचे बारकावे सांगितल्यानंतर त्या बारा तेजोगोलांच्या वर्तुळाभोवती तसेच एक दुसरे बारा तेजोगोलांचे वलय दिसू लागते. हे वर्तुळदेखील दुसऱ्या बारा संतपुरुषांचे आहे. हे सर्व सेंट फ्रॅन्सिसचे अनुयायी आहेत. निरनिराळ्या पंथांच्या संतांमधील आणि परमेश्वराकडे जाण्याच्या मार्गामधील एकवाक्यतेचे आणि सुसंवादाचे ही दोन तेजोमंडले प्रतीक आहेत.

सूर्यमंडलावरील प्रवचनांमधून दैवी कृपा (Grace), साक्षात्कार (Vision), प्रेम (Love) आणि तेज (Radiance) यांच्यातील परस्परसंबंध स्पष्ट होतात. त्यानंतर एक तिसरे तेजोगोलांचे वर्तुळ दिसू लागते; पण तेवढ्यात दान्ते त्याच्या पुढच्या स्वर्गमंडलात– मंगळलोकात– पोचलेला असतो. इथे त्याच्या समोर प्रकाशाच्या पट्ट्यांनी बनलेला आणि लाल माणकांनी खचलेला क्रूस प्रकट होतो आणि दान्तेला ख्रिस्ताचा साक्षात्कार होतो. इथलेही आत्मे स्वर्गीय गान करत असतात. मंगळ हा युद्धाचे प्रतीक आहे आणि इथले आत्मे हे ज्यांनी आपल्या धर्मासाठी आपले प्राण वेचले अशा महात्म्यांचे आहेत. सर्व ज्ञानापेक्षा ह्या प्रकारचे हौतात्म्य हे मोठे आहे, असेच दान्तेला सुचवायचे आहे. ह्या आत्म्यांबद्दल दान्तेला वाटणारी कृतज्ञता ही प्रार्थनेचे रूप घेऊन इथे व्यक्त होते. इथेच दान्तेची त्याचा पूर्वज (great–great grandfather of Dante) काच्चिआगुइदाशी भेट होते. काच्चिआगुइदाकडून त्याला त्याच्या कुटुंबाचा पूर्वेतिहास कळतो, आणि स्वतःच्या गौरवशाली पूर्वजांचा अभिमान त्याच्या मनात जागृत होतो. त्याच्याच अनुषंगाने आपल्या पूर्वजांच्या मुखातून दान्ते आपल्या काळातील भ्रष्टाचारावर कोरडे ओढतो. काच्चिआगुइदा दान्तेला त्याच्या भवितव्याबद्दलही– विशेषतः त्याच्या हद्दपारीबद्दल पूर्वसूचना देतो.



भूत-वर्तमान-भविष्य हे कसे परस्परांशी अविभाज्यपणे संलग्नित आहेत आणि सर्व घटनांच्या मागे कसे पूर्वनियोजन आहे, हेच ह्या भेटीतून दान्तेला ध्वनित करायचे आहे. त्याचबरोबर, सर्व काही जरी पूर्वनियोजित असले, व्यक्तीची नियती निश्चित झालेली असली, तरी ती व्यक्ती कशी 'स्वतंत्र' राहते हेही दान्तेला या भेटीत सुचवायचे आहे.

इथून दान्ते बिॲट्रिसबरोबर गुरुमंडलात येतो. या धवल मंडलावर न्यायाची कास धरणारांचे आत्मे वास करतात. दान्ते त्यांच्याकडे पाहतो त्या वेळी ते निरनिराळ्या अक्षरांच्या आकारांत एकत्र येऊन " Love justice, ye that judge the earth." असे वाक्य तयार करतात आणि त्यानंतर त्या वाक्यातील शेवटचे अक्षर 'एम्' ( मूळ वाक्य असे आहे– Diligitie institiam qui indicatis terram) ह्याचे रूपांतर होऊन त्या ठिकाणी गरुडाची प्रतिमा तयार होते. गरूड हे न्यायाचे प्रतीक आहे. जगाच्या पाठीवर शांती आणि ऐक्य नांदावे म्हणून देवाने ज्या रोमन साम्राज्याची योजना केली होती त्या साम्राज्याचे मानचिन्ह असलेल्या गरुडाची दान्तेने केलेली निवड ही अतिशय समर्पक आणि सयुक्तिक आहे.

आपल्या प्रकाशाच्या बिंदूंनी एकेक अक्षर जुळवून न्यायावर प्रेम करा, अशा अर्थाचे वाक्य गुरूवरील आत्मे तयार करताना दान्ते पाहतो, ह्या प्रसंगाचे स्पष्टीकरण द्यायला हवे. इतर अनेक प्रसंगांप्रमाणे ह्याचे महत्त्वदेखील प्रतीकात्मकच आहे. एकेक अक्षर हळूहळू तयार होते आणि मग सावकाश ते वाक्य बनते ह्यात मानवजातीला 'न्यायाचे' आकलन हे हळूहळू चुकतमाकत होत असते हे सुचविलेले आहे. पृथ्वीवर 'न्याय' प्रस्थापित करण्याची प्रक्रिया किती दुष्कर



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

आहे हे त्यातून स्पष्ट केले आहे. शेवटच्या शब्दाचे शेवटचे अक्षर पूर्ण झाल्याशिवाय संपूर्ण वाक्याचा अर्थ ज्याप्रमाणे स्पष्ट होऊ शकत नाही, त्याप्रमाणेच पृथ्वीवरील घटनांमागील सूत्रही तो घटनाक्रम पूर्ण झाल्याशिवाय मानवाला कळू शकत नाही, असाही त्याचा अर्थ आहे. इतिहासाचा अर्थ आणि देवाच्या न्यायाचे स्वरूप याचे दान्तेचे आकलन कसे क्रमशः होत गेले हेदेखील सावकाश झालेल्या त्या अक्षरांच्या जुळणीतून आणि शेवटच्या अक्षराचे रूपांतर रोमन गरुडात होण्यातून दान्तेला ध्वनित करायचे आहे (दान्तेचे न्याय, शासन आदिसंबंधीचे विचार आपल्याला त्याच्या Do Monarchia या ग्रंथात सापडतात. समतेच्या आणि लोकशाहीच्या आजच्या युगात दान्तेची रोमन साम्राज्याची भलावण आणि त्याचे शासनासंबंधीचे विचार हे अर्थातच पटण्यासारखे नाहीत. पण दान्तेच्या विचारांमागचे मुख्य सूत्र आणि प्रेरणा जर लक्षात घेतली, तर दान्ते वाटतो तितका 'प्रतिगामी' नाही हे डॉरोथी सेअर्सने तिच्या Hell च्या प्रस्तावनेत चांगले स्पष्ट केले आहे.).

दान्तेच्या मनात निर्माण झालेल्या प्रश्नांना उत्तर देताना गरूड जे सांगतो त्याचे मुख्य सूत्र असे आहे की, मानवी प्रज्ञेला परमेश्वराच्या न्यायाची अथांगता कळणे शक्य नाही. माणसाने परमेश्वराने न्याय दिला किंवा नाही हे विचारू नये, ते त्याच्या आवाक्याबाहेर आहे. त्याने फक्त हे स्वीकारायला हवे, की परमेश्वराचे निवाडे हे फक्त त्याच्या इच्छेचे निदर्शक आहेत. म्हणूनच ते न्याय्यही आहेत. परमेश्वरी इच्छा हाच न्यायाचा अंतिम आणि एकमेव दंडक मानायला हवा. आपल्या इच्छा या परमेश्वरी इच्छेचीच प्रतिबिंबित रूपे मानायला हवीत. शेवटी, गरूड (म्हणजेच इथे दान्ते) समकालीन युरोपमधील न्यायाच्या अधःपतनाचा धिक्कार करून शांत होतो.

दान्ते आणि बिॲट्रिस त्यानंतर शनिमंडलावर येऊन पोचतात. तिथे एका सोनेरी सोपानापाशी अनेक चिंतकांचे (Contemplatives) प्रकाशमान आत्मे गर्दी करत असलेले त्यांना दिसतात. त्या सोपानाचे वरचे टोक हे दान्तेच्या दृष्टिपथात येऊ शकत नाही, इतके ते अंतराळात हरवलेले आहे. परमेश्वरविषयक चिंतन आणि आध्यात्मिक साक्षात्कार यांचे सोपान हे पारंपरिक प्रतीक आहे. दान्ते आता त्या अवस्थेपर्यंत येऊन पोहचला आहे. या ठिकाणी पीटर डॅमिअन व सेंट बेनेडिक्ट यांचे आत्मे दान्तेशी संवाद करतात. त्यांच्या बोलण्याचा विषय प्रामुख्याने चर्चमधला भ्रष्टाचार हा आहे. दान्ते गोंधळून जातो कारण त्याची अशी कल्पना असते की, चिंतकाच्या अवस्थेत असलेले आत्मे हे ऐहिकाचा अजिबात विचार करीत नसावेत. पण चिंतक होणे म्हणजे पृथ्वीवरील परमेश्वराच्या कार्याबद्दल उदासीन होणे नव्हे, हेच दान्तेला इथे सुचवायचे आहे. म्हणूनच इथल्या चिंतकांचे आत्मे पृथ्वीवरील चर्चबद्दल आणि त्याच्या नैतिकऱ्हासाबद्दल इतक्या पोटतिडिकेने बोलताना आपल्याला दिसतात.

इथून पुढच्या स्वर्गलोकात जाताना आपण आता परमेश्वराच्या जवळ येऊन पोचलो आहोत असा आत्मविश्वास दान्तेच्या मनात निर्माण झालेला आहे. बिॲट्रिस त्याला म्हणते–

"Beatrice began, 'Before long than wilt raise
Thine eyes and the Supreme Good thou wilt see;
Hence thou must sharpen and make clear the gaze."

(Para. XXII, 124–126)

शनिमंडलातून निघून ते आता तारामंडलात येतात– Heaven of the Fixed Stars. दान्ते आतापर्यंत पार केलेल्या सप्तस्वर्गांकडे नजर टाकतो आणि आपण कोणत्या अथांग अंतराळात येऊन पोचलो आहोत याची त्याला जाणीव होते. आपला पृथ्वीगोल किती नगण्य आहे याचे भान त्याला होते. इतका मोठा आध्यात्मिक प्रवास केल्याशिवाय विश्वाचे आणि त्यातल्या आपल्या पृथ्वीवरील अस्तित्वाचे आकलन आपल्याला होत नाही हेच या ठिकाणी दान्तेला सुचवायचे आहे. या तारकामंडलात प्रकाश अधिकच तेजोमय झालेला आहे. कारण इथे ख्रिस्त आणि चर्चमधील अन्य संत आहेत. बिॲट्रिसच्या स्मिताने दान्ते क्षणभर दिपून जातो, पण क्षणभरच. आता तो प्रकाश पेलण्याचे आध्यात्मिक सामर्थ्य त्याच्यात आलेले आहे. आणि आता तो व्हर्जिन आणि ख्रिस्ताचे शिष्य आणि नव्या आणि जुन्या करारातले इतर संत यांच्या तेजःपुंज ज्योतीकडे पाहू शकतो. दान्तेलाही त्यांनी आपल्या स्वर्गीय आनंदाचा वाटेकरी करून घ्यावे अशी विनंती बिॲट्रिस इथे असणाऱ्या







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आत्म्यांना करते तेव्हा सेंट पीटर दान्तेला धर्मनिष्ठेबद्दल ( Faith ) प्रश्न करतो. एक प्रकारे या ठिकाणी सेंट पीटरबरोबरच सेंट जेम्स आणि सेंट जॉन हेदेखील दान्तेची अनुक्रमे आशा ( Hope ) व प्रेम (Love/Charity) यांविषयी परीक्षाच घेतात. मागे हे सांगितलेच आहे, की ॲक्विनासच्या शिकवणीनुसार अंतिम साक्षात्कारापूर्वी साधकाला Faith, Hope आणि Love हे सद्‌गुण अंगी बाणवावे लागतात. केवळ सत्कृत्यांमुळे ते अंगी येत नाहीत तर त्याच्यासाठी दैवी कृपा पाठीशी असावी लागते. लहानपणीच झालेली बिॲट्रिसची भेट हे दान्तेला मिळालेल्या दैवी कृपेचेच चिन्ह आहे. नुसत्या कोरड्या ज्ञानाने किंवा आकलनाने आध्यात्मिक साक्षात्कार प्राप्त होऊ शकत नाही. दान्ते ही परीक्षा उत्तम प्रकारे उत्तीर्ण होतो आणि त्याच्या पुढच्या प्रवासाला लागतो.

बिॲट्रिस आणि दान्ते त्यानंतरच्या स्वर्गलोकात म्हणजे ज्याला Primum Mobile म्हणतात त्या ठिकाणी येतात. हे जगन्नियंत्याच्या संचालनाचे केंद्र आहे. या ठिकाणी कुठलेच तारे नाहीत, पण इथूनच सर्व ग्रहांच्या गतीचे नियंत्रण होते. इथून पुढे स्थल-कालाच्या मर्यादा गळून पडतात. इथे प्रथमच दान्तेला बिॲट्रिसच्या डोळ्यात परमेश्वराचा प्रकाश एका सूक्ष्मातिसूक्ष्म अशा तेजःपुंज बिंदूच्या स्वरूपात दिसतो. त्याच्या भोवती नऊ तेजाची वलयेही दिसतात. ही वलये म्हणजे देवदूत. दान्तेची इच्छा ओळखून बिॲट्रिस त्याला विश्वनिर्मितीमागचे गूढ रहस्य स्पष्ट करून सांगते. त्यानंतर देवदूत आणि परमेश्वराचा प्रकाश लुप्त होतात आणि दान्ते बिॲट्रिसकडे पाहतो. तिच्या कल्पनातीत सौंदर्याचे अलौकिकत्व आता केवळ अवर्णनीय आहे. दान्तेच्याच शब्दांत सांगायचे तर,

"From the first hour I looked upon her face
In this life, till that vision, I could trust
The poet in me to pursue her praise,
Now in her beauty's wake my song can thrust
Its following flight no farther, I give o'er
As, at his art's end, every artist must."

(Para. XXX, 28–33)

आता आपण परमेश्वराच्या सन्निध त्याच्या Empyrean मध्ये येऊन पोचलो आहोत असे ती दान्तेला सांगते. प्रकाशाच्या एका झोतात ते वेढले जातात. क्षणभर दान्ते त्याने दिपून जातो, पण लगेचच त्याची दृष्टी इतकी समर्थ होते की ती कशानेच निष्प्रभ होऊ शकत नाही. प्रथम त्याला प्रकाशाची एक सरिता दिसते. ही चराचरावर परमेश्वराच्या कृपेचा वर्षाव करणारी महानदी आहे. तिथे तो आपले डोळे धुऊन घेतो आणि त्याला स्वर्गातले संत दिसतात. दैवी हिमधवल गुलाबपुष्पाच्या सिंहासनावर ते विराजमान झालेले आहेत. ह्या गुलाबपुष्पाच्या पाकळ्यांचे सहस्रावधी स्तर आहेत आणि त्यांवर देवदूत, व्हर्जिन आणि इतर मुक्तात्मे दैवी कृपेखाली परम सुखाचा अनुभव घेत बसलेले आहेत. मध्ययुगीन वाङ्मयात गुलाब हे ऐहिक प्रेमाचे प्रतीक मानले जाते. दान्तेचे हिमधवल गुलाबपुष्प हे अलौकिक प्रेमाचे प्रतीक आहे. त्याची बिॲट्रिस आपल्याला ह्याच गुलाबपुष्पावर विराजमान झालेली आढळते. दान्तेला परमेश्वराच्या द्वारापर्यंत ती घेऊन आलेली आहे आणि आता परमेश्वराच्या प्रत्यक्ष दर्शनासाठी तिने त्याला सेंट बर्नार्डच्या सुपूर्द केले आहे.

नऊ स्वर्गमंडलांच्या पलीकडे हे परमेश्वराचे Empyrean आहे. इथे परमेश्वराबरोबरच संतांचा आणि देवदूतांचाही वास आहे. हे दिक्कालापलीकडचे स्थान आहे. खरे म्हणजे त्याला स्थान मानण्यापेक्षा 'अवस्था' मानणे अधिक सयुक्तिक होईल. कृपा-सरितेपाशी दान्तेचे डोळे दिपून जाऊन मिटतात. कृपा-सरितेत धुतल्यानंतर त्यांना नवी दिव्य दृष्टी प्राप्त होते. डोळ्यांचे दिपून जाणे हे एक प्रकारचे मरणच आहे आणि हे मरण जगल्याशिवाय त्या अमर तत्त्वाचा साक्षात्कार संभवत नाही (ह्या संकल्पनेचा एलिअटवर किती खोल प्रभाव पडला आहे, ह्याची रसिकांना आठवण करून देणे अप्रस्तुत होणार नाही.). स्वत्व संपविल्याशिवाय अलौकिक प्रेमाचा आणि त्या प्रेमस्वरूप परमेश्वराचा साक्षात्कार होणे शक्य नाही हेच दान्तेच्या एम्पीरिअनमधल्या अनुभवाचे सार आहे. बिॲट्रिस मध्येच निघून जाते असे नाही. ती फक्त






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वस्थानी जाऊन पोचते. ती दान्तेत सामावली आहे आणि त्याला तिची बाह्यात्कारी आवश्यकता उरलेली नाही. खरे तर ती जात नाहीच. कारण ती त्याच्यातच आहे आणि काही क्षणांतच तो तिच्यापाशी– परमेश्वरापाशी– त्याच्या अंतिम सत्यापाशी– त्याच्या अंतिम सौंदर्यनिधानापाशी– त्याच्या प्रेमाच्या परमसीमेवर जाऊन पोचणार आहे. बिॲट्रिसमध्येच सामावून जाणार आहे. आपल्या प्रियकर महायात्रीच्या स्वागताला बिॲट्रिस तिथे आधीच तयार असणार आहे.

सेंट बर्नार्डच्या प्रार्थनेवरून व्हर्जिन दान्तेला खऱ्या प्रकाशाचे दर्शन घडविते. तिथे त्याला सर्व सृष्टीमागच्या एकसूत्रतेचे दर्शन होते. तीन तेजोवलयांतून त्याला ट्रिनिटीमधल्या त्रिमूर्तीचे आणि पाठोपाठ ख्रिस्ताचे संपूर्ण दर्शन घडते. चिरंतन प्रकाशात न्हाऊन निघालेल्या एम्पीरिअनच्या आनंदमंडलात दान्तेची इच्छाशक्ती परमेश्वरी इच्छेत विलीन होते आणि त्याला चराचरांत भरून राहिलेल्या परमेश्वराच्या अथांग प्रेमाचा साक्षात्कार होतो. 'डिव्हाइन कॉमेडी 'चा शेवटचा चरण महायात्री दान्ते पुरा करतो :

" High phantasy lost power and here broke off
Yet, as a wheel moves smoothly, free from jars,
My will and my desire were turned by love,
The love that moves the sun and the other stars."
(Para. XXXIII, 142–145)

– ६ –

परिचय इथे संपला. तो पुरेसा नाही याची मला जाणीव आहे. दान्तेच्या काव्यगुणांची, त्याच्या विनोदबुद्धीची, त्याच्या पात्ररेखाटन करण्याच्या कौशल्याची, त्याच्या वाद-प्रतिवाद करण्याच्या चातुर्याची, त्याच्या प्रज्ञेची जी झेप आहे तिची–एकूणच, त्याच्या प्रतिभेच्या बहुविध वैशिष्ट्यांची ओळख करून देणे इथे शक्य झालेले नाही. ह्या परिचयाने माझेच समाधान झालेले नाही हे मी सुरुवातीलाच सांगितले आहे. अशा स्थितीत 'कॉमेडी' कडे परत एकदा मूल्यमापनाच्या उद्देशाने दृष्टी टाकणे संभवतच नाही. शिवाय, त्यासाठी लागणारा व्यासंगही माझ्यापाशी नाही. तरीपण 'कॉमेडी 'च्या माझ्या अनुभवाकडे एक धावता दृष्टिक्षेप टाकावासा वाटतो.

'कॉमेडी' वाचायला घेण्यापूर्वी कित्येक वर्षे ती मला ऐकून माहीत होती. वाचनात येणाऱ्या संदर्भांमधून तिच्यासंबंधी एक गूढ आकर्षण निर्माण झाले होते. पण त्याच संदर्भावरून तिच्यासंबंधी एक आदरयुक्त भीतीही ( awe ) वाटत होती. सारखे असे वाटायचे की 'कॉमेडी' ही आपल्यासाठी नाही. विद्वानांनी आणि संशोधकांनीच ती वाचायची असते. त्याचबरोबर तिचे 'दूरत्व 'ही जाणवायचे. इंग्रजी वाङ्मयाच्या अभ्यासकाला चॉसर तसा दूरचा वाटत नाही. पण दान्ते मला फार दूरचा वाटत होता. एक तर इटालियन; त्यातून मध्ययुगीन. शिवाय त्याची 'कॉमेडी' धार्मिक वाटायची. या सर्व गोष्टींमुळे 'कॉमेडी' वाचायचा कधी धीर झाला नाही. अभिजात वाङ्मयासंबंधी असे म्हटले जाते की, त्याच्यासंबंधी फक्त आदराने बोलायचे असते आणि "केव्हातरी वाचायचे आहे" असे म्हणत त्यांच्याकडे बघायचे असते. 'कॉमेडी' बाबत माझेही तसेच होत राहिले. पुढे एलिअटच्या काव्याचा अभ्यास करताना दान्ते वारंवार समोर येऊ लागला. एलिअटवरील दान्तेची छाया फार गडद आहे. त्यामुळे वाङ्मयीन कारणासाठी का होईना, दान्ते वाचणे आवश्यक वाटू लागले–नव्हे, एका टप्प्यावर ते टाळणे अशक्य झाले. वेळोवेळी आलेले 'कॉमेडी 'तील संदर्भ हेदेखील तिच्याबद्दलचे दूरत्व कमी करत होतेच. त्यातून एलिअटने आपल्या दान्तेवरील निबंधात सुरुवातीलाच "What is surprising about the poetry of Dante is that it is, in one sense, extremely easy to read." असे म्हटल्याचे लक्षात आले. संदर्भात वाचनांत आलेल्या उद्धरणांनी या विधानाला पुष्टी दिली. शिवाय, दान्ते, हा काही एलिअटइतका कठीण नसणार असेही मनोमन वाटत होतेच. मग 'कॉमेडी 'च्या वाचनाला वेळ लागला नाही.

'इन्फर्नो 'चा पहिला कँटो वाचला आणि दान्तेबद्दलची भीड चेपली. आपण उगाच इतके दिवस हे वाचन पुढे ढकलले असे वाटले. जसजसा मी 'कॉमेडी' वाचत गेलो, तसतसे तिचे दूरत्व कमी झाले. 'कॉमेडी' फार जवळची वाटू लागली. ती इटालीची राहिली नाही, मध्ययुगीन राहिली नाही.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

ती सर्वांची सर्वांसाठी असलेली वाटू लागली. आपली वाटू लागली.

गेली सहाशे वर्षे प्रत्येक पिढीला 'कॉमेडी'ने प्रभावित केले आहे त्याचे मुख्य कारण तिची सार्वकालिकता, तिची Universality हे असावे. देशोदेशीच्या प्रत्येक पिढीला दान्तेच्या 'कॉमेडी'त आपले प्रतिबिंब आढळत आले आहे. कारण तिची मुळे मानवी जीवनात खोलवर गेलेली आहेत. दान्तेने जरी असे म्हटले असले, की 'कॉमेडी'चा विषय आत्म्याचा मरणोत्तर प्रवास हा आहे. तरी वाचकाला जो अनुभव येतो, तो तिच्यात जिवंतपणे प्रतिबिंबित झालेल्या समग्र मानवी जीवनाचा. जीवनाच्या प्रत्येक अंगाला ती केवळ स्पर्श करते असे नाही, तर त्याचे उत्कट, समर्थ आणि प्रत्ययकारी दर्शन घडवते. भौतिक, नैतिक, आध्यात्मिक व सामाजिक-राजकीय या सर्वच दृष्टिकोणांतून 'कॉमेडी' माणसाच्या अस्तित्वाचा, त्याच्या नियतीचा आणि त्याच्या आत्मिक अंतरंगाचा जो वेध घेते, त्याची तुलना फक्त शेक्सपिअरशीच होऊ शकते. एलिअटची काव्यप्रक्रियेसंबंधातली परवलीची संज्ञा वापरून बोलायचे तर अनादि, अनंत आणि अथांग अशा मानवी अस्तित्वाचा एवढा समर्थ आणि समृद्ध Objective correlative आपल्याला अन्यत्र आढळणार नाही. भौतिक आणि आध्यात्मिक, ऐहिक आणि पारलौकिक, वैयक्तिक आणि सामाजिक या सर्वच पातळ्यांवरील जीवनोन्मेषांना दान्ते 'कॉमेडी'त हृदयस्पर्शी प्रतिमांच्या माध्यमातून समूर्त करतो. अंतर्बाह्य मानवी जीवनाला व्यापणारा असा 'कॉमेडी'चा आवाका आहे. घटना कुठेही घडत असल्या–पृथ्वीच्या तळाशी इन्फर्नोत किंवा अंतराळातल्या प्रकाशमंडलात–त्या अतूटपणे जीवनातल्या मानवी नाट्याशी निगडित असतात. दोन्ही बाजूंनी–जन्मपूर्व आणि मरणोत्तर–जीवन उघडे आहे. ते अल्प आहे. अनिश्चित आहे. अनित्य आहे, भयकारक रीतीने स्वतंत्र आहे. म्हणूनच त्याच्या स्पंदनात एक अगतिक करून सोडणारी ईषणा आहे तीच जीवनाची चेतना आणि प्रेरणा आहे आणि तीच मानवाच्या अंतर्यामीची अस्वस्थता, अशांती आहे. परमेश्वरी कृपेचा ( Grace ) स्पर्श झाल्याखेरीज तिला सांत्वना नाही, शांती नाही.

परमेश्वरी कृपा अथांग आहे, अपार आहे. पण परमेश्वरी न्यायही तितकाच जीवनव्यापी आहे. अशा प्रकारचे जीवनाचे आकलन हे आपल्या 'कॉमेडी'च्या अनुभवाचे सार आहे. दान्तेच्या प्रतिभासामर्थ्याने वाचकाला या शंभर कँटोंच्या महायात्रेत आत्मप्रत्ययाच्या खुणा जागोजागी भेटत राहतात आणि तो दान्तेची सोबत तिन्ही लोकांत आनंदाने करत राहतो.

मध्ययुगीन युरोपमधील दान्तेच्या 'डिव्हाइन कॉमेडी'ची महत्ता ही जितकी तिच्या सार्वकालिकतेत आहे, तितकीच ती तिच्यात अनुस्यूत असलेल्या व्यक्ती आणि समाज यांमधील परस्परसंबंधांतही असावी असे वाटते. किंबहुना त्यामुळेच ती त्या काळापेक्षा एकदम भिन्न असलेल्या देश-काल-परिस्थितीतल्या माणसाला आकृष्ट करून घेऊ शकते असे म्हटले पाहिजे. विसाव्या शतकातल्या मानवी संस्कृतीच्या एलिअटसारख्या श्रेष्ठ भाष्यकाराला आपल्या प्रतिभेच्या आविष्कारासाठी दान्तेच्या भक्कम संदर्भांचा आधार घ्यावासा वाटावा याच्या मुळाशीपण हीच गोष्ट असली पाहिजे. नुसत्या कालसाधर्म्याच्या आधारावर एलिअटच्या व्यापक दान्ते-संदर्भाचे समर्थन करता येणार नाही 'कॉमेडी'त मध्ययुगीन इटालीतील सामाजिक व राजकीय परिस्थितीचे फार प्रत्ययकारी चित्रण आहे हे तर खरेच आहे. पण तिचे अंतरंग हे सर्वथा नैतिक आहे, हे त्याहून जास्त महत्त्वाचे आहे. मला वाटते, एलिअटला 'कॉमेडी'च्या या नैतिक अंतरंगाने प्रभावित केले असले पाहिजे. दान्तेच्या नैतिकतेच्या मुळाशी न्यायाची संकल्पना होती.

दान्तेच्या न्यायाच्या संकल्पनेचा ऊहापोह आपल्याला त्याच्या डी मॉनर्किया या ग्रंथात सापडतो–अर्थात 'कॉमेडी'तूनही ती संकल्पना चांगली स्पष्ट होते. अन्यायाबद्दलची त्याची चीड ही त्यात ठिकठिकाणी प्रगट झालेली आहे. दान्तेच्या मते अन्यायाच्या मुळाशी माणसाची हाव, त्याची स्वार्थलालसा आहे. याउलट, न्यायाच्या संवर्धनासाठी माणसाच्या ठायी उदार मनोवृत्ती आवश्यक आहे. औदार्य आणि कणव ( Charity ) ह्याच गोष्टी स्वार्थाला छेद देऊ शकतात. म्हणून न्यायासाठी या दोन वृत्तींची म्हणजेच खऱ्याखुऱ्या वैश्विक प्रेमाची–विश्वबंधुत्वाची आवश्यकता आहे. दान्तेची ही धारणा लक्षात घेतली तरच दान्ते अन्यायाबद्दल इतका तीव्र संताप वेळोवेळी का व्यक्त करतो, हे समजू शकेल.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

सत्ता आणि संपत्ती यांच्यासाठी झालेल्या चर्च-मधील संघर्षाबद्दलचा निषेध आणि धिक्कार दान्ते किती तीव्रतेने करतो हे मुळातूनच पाहायला हवे. न्यायाच्या ह्या महान आदर्शांची प्रतारणा करणे हे दान्तेच्या लेखी सर्वांत मोठे पाप आहे. म्हणूनच ख्रिस्ताशी बेइमान होणारा ज्युडास आणि सीझरशी प्रतारणा करणारे कॅसिअस व ब्रूटस यांचे स्थान हे नरकाच्या सर्वांत खालच्या वर्तुळात–प्रत्यक्ष सैतानाच्या मुखात आहे नरक म्हणजे सगळ्या बेइमानांची वस्ती–सगळ्या प्रकारच्या अन्यायी माणसांची वसाहत.

पण दान्तेच्या न्यायकल्पनेसाठी इतक्या विवेचनाची आपल्याला आवश्यकता नाही. फक्त, 'कॉमेडी' संबंधी जे त्याने लिहिले आहे त्याची आठवण ठेवली तरी पुरेसे आहे.

ती आठवण करून देण्यासाठी पूर्वी उद्धृत केलेले अवतरण पुनरुक्तीचा दोष पतकरूनही परत उद्धृत करावेसे वाटते :

"The subject of the whole book taken merely in the literal sense is the state of the soul after death, straightforwardly affirmed........ but if the work is taken allegorically its subject is *Man, as by good or ill deserts, in the exercise of his free choice, he becomes liable to rewarding or punishing Justice.*"

अर्थशून्यपणे आपल्याच आवर्तात विमनस्कपणे गिरक्या घेणारी आजच्या माणसांची गर्दी पाहून एलिअटला इन्फर्नोतील तिसऱ्या-चवथ्या कँटोतील छायांची आठवण होणे स्वाभाविक होते. खरे तर, आजच्या वाचकाला 'कॉमेडी'चे आपल्या युगाशी असलेले नाते ठायी ठायी जाणवत राहते. ते नाते सविस्तरपणे स्पष्ट करणे इथे शक्य नाही कारण तो एखाद्या स्वतंत्र लेखाचा विषय आहे. परंतु ह्या नात्याचे स्वरूप कशा प्रकारचे आहे, हे थोडक्यात सांगता येईल.

आजची युगवेदना सर्वसाधारणपणे अस्तित्ववादाच्या चौकटीत मांडण्यात येते. तिच्यात मानवी अस्तित्वाचा अर्थ लावण्याचा (किंवा तो लावण्याचा फोलपणा सिद्ध करण्याचा) प्रयत्न असतो. मानवी अस्तित्वाच्या समस्येची मांडणी निरनिराळे अस्तित्ववादी तत्त्वज्ञ वेगवेगळ्या पद्धतींनी करत असले तरी त्यात शेवटी मानवाच्या इच्छाशक्तीला–त्याच्या निवडीच्या स्वातंत्र्याला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त होते. Choice ला असलेले महत्त्व तुम्ही कुठलाही दृष्टिकोण स्वीकारला तरी नाकारता येत नाही. दान्तेच्या 'कॉमेडी'कडे थोडे अलिप्तपणे पाहिले तर मला वाटते, आपल्याला त्याचे या पातळीवर आपल्या युगाशी असलेले नाते जाणवू शकेल. आपणच आपला नरक (किंवा नरकातले आपले स्थान) निवडत असतो आणि आपणच आपला स्वर्ग गाठू शकतो हे 'डिव्हाइन कॉमेडीचे' मुख्य सूत्र आहे हे लक्षात घेतले तर ते नाते अधिक स्पष्ट होऊ शकेल असे वाटते. (आजची युगवेदना व्यक्त करणारे बहुतेक मोठे लेखक बेकेट, आयनेस्को, एलिअट इ. हे exiles होते. दान्तेलाही परागंदा होण्याचा अनुभव होता. हा योगायोग लक्षणीय मानण्याला जागा असावी !)

याच युगवेदनेच्या अभिव्यक्तीचा दुसरा पैलू म्हणजे तिच्यात व्यक्त होणारा तीव्र निषेध. It's basically a literature of protest and anger. या पातळीवर तर दान्ते आपल्याला एकदम जवळचा वाटावा. दान्तेच्या सात्त्विक संतापाचा नुकताच वर उल्लेख आला आहे. तेव्हा त्यासंबंधी पुनरुक्ती न करता फक्त एवढेच म्हणावेसे वाटते की, समाजातील अन्यायाविरुद्ध पोटतिडिकेने आणि जागरूकपणे संताप व्यक्त करणारा दान्ते हा पहिला कवी आहे. आजच्या बव्हंश प्रोटेस्टला वैचारिक किंवा तात्त्विक अधिष्ठान नसते. बहुतेक लेखक ती आपली जबाबदारी नाही, असेच मानतात. त्यातूनही जर मनावर बुद्धीचा (reason) दाब वाढला–म्हणजे कुठे तरी प्रोटेस्टच्या पाठीमागे तात्त्विक (Ideological) भूमिका आवश्यक असते असे जाणवले– तर एक भोंगळ 'बांधिलकी' ते कसेबसे मान्य करतात. 'बांधिलकी' काय असते हे शिकायचे असेल तर आपल्याला दान्तेसारखे दुसरे उदाहरण आढळणार नाही. आजचे मानसशास्त्र आणि आजचे समाजशास्त्र 'पाप'च काय पण 'गुन्हा' देखील गुन्हा मानत नाहीत. त्यांचे समर्थन करण्याची एक वेगळीच परिभाषा त्यांनी शोधून काढली आहे. असूया म्हणजे हीनगंड, हावरटपणा म्हणजे व्यक्तिगत नैराश्य, गुन्हेगार म्हणजे केवळ संतुलन गमावून बसलेली व्यक्ती अशा प्रकारची ही परिभाषा आहे. त्या परिभाषेच्या मुळाशी असलेली कल्पना अशी आहे की, व्यक्ती ही अनाकलनीय आणि अगम्य अशा सुप्त शक्तींची गुलाम असते. तशी प्रत्येकच

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

व्यक्ती आपल्या जागी ठीक आहे. चांगली आहे. फक्त समाजच बिघडला आहे, अशा प्रकारची ही धारणा आहे. दान्तेचे वैशिष्टय आणि महत्त्व– विशेषतः आपल्या आजच्या संदर्भात– हे मानायला हवे की, दान्ते प्रत्येक व्यक्तीवर त्याच्या कर्माची/कृत्याची जबाबदारी टाकतो. ब्रुनेटो लॅटिनीलाही इन्फर्नोच्या सातव्या वर्तुळात तो लोटतो.

प्रत्येक पिढीला दान्तेमध्ये आपले प्रतिबिंब आढळत आले आहे. आजच्या पिढीलाही तिचे प्रतिबिंब त्यात आढळत असल्यास नवल नाही. पण 'कॉमेडी' ची महत्ता ही आहे, की तिच्यात प्रत्येक व्यक्तीला आपले प्रतिबिंब स्वच्छपणे दिसत राहते. मात्र तिचे अनन्य-साधारण महत्त्व मात्र एलिअटच्याच शब्दांत सांगायला हवे :

"The majority of poems one outgrows and outlives, as one outgrows and outlives the majority of human passions : Dante's is one of those which one can only just hope to grow up to at the end of life." (S. E. P. 251)

## DANTE : SELECT BIBLIOGRAPHY


### A. TEXT (Original)

1. Vita Nueva, ed. Barbi Plerence, 1932.
2. Convivio, ed. Busnelli and Vandelli 2v., Florence, 1934–37.
3. Rime, ed. Contini Turin, 1946.
4. De Bulgari Elequentia, ed. Marige, Florence, 1948.
5. Le Opere, ed. Moore and Toynbee, 4th ed. Oxford, 1924.
6. La Divina Commedia, ed. Scartaxinni and Vandelli.
7. Le Opere, Florence, 1921.
   (A standard text of all the works in one volume published by the Societa danteaca italiana.)
8. Epistolae, ed. Toynbee, Oxford, 1920.

### B. TEXT (English Translation)

1. Laurence Binyon, The Divine Comedy, 1933–43.
2. A. J. Butler, The Hell of Dante, 1892.
3. A. J. Butler, Purgatory, 1880.
4. A. J. Butler, Paradise, 1894.
5. Carlyle, Okey and Wickstead, The Divine Comedy, 3 v., 1899–1900. (The Temple Classics edn.)
6. H. F. Cary, The Divine Comedy, 1814.
7. F. J. Church, De Monarchia, 1879.
8. C. E. Norton, The Divine Comedy, 3 v., 1891–92 (The best version in prose).
9. J. D. Sinclair, The Divine Comedy, 3 v., 1940–46 (with commentary).
10. Paget Toynbee, Letters, 1920 (with Latin text).
11. W. W. Vernon, Readings on the Inferno of Dante, 2 v., 2nd ed., 1904.
12. W. W. Vernon, Readings on the Purgatorie, 2 v., 3rd ed., 1907.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

13. W. W. Vernon, Readings on the Paradise, 2 v. 2nd ed., 1909.
14. J. B. Fletcher, The Divine Comedy, 1931.

**C. Handbooks and Biographies**

1. M. Barbi, Life of Dante, Eng. Tr. P. G. Ruggiers, 1954.
2. U. Cosme, Handbook of Dante Studies, Eng. Tr. Moore, 1950.
3. C. A. Dinsmore, Life of Dante, 1919.
4. C. A. Dinsmore, Aids to the Study of Dante, 1903.
5. E. G. Gardner, Dante, new ed. 1923.
6. J. A. Symonds, Introduction to the Study of Dante, 3rd ed. 1893.
7. Paget Toynbee, Dante Alighiery : His Life and work, 4th ed. 1910.

**D. Dictionaries, Concordances and Bibliographies**

1. E. A. Fay, Concordance to the Divina Commedia, 1894.
2. W. C. Lane, The Dante Collection in the Harvard and Boston Public Libraries, 1890.
3. Paget Toynbee : Dictionary of Proper Names and Notable Matters in the Works of Dante, 1898.
4. Paget Toynbee : Britain's Tribute to Dante in Literature and Art, 1921.

**E. Criticism**

1. L. Abercrombie, The Idea of Great Poetry, 1925.
2. G. Carducci, Dante's Work, Eng. Tr., 1923.
3. W. D. Carpenter, The Spiritual Message of Dante, 1914.
4. J. J. Chapman, Dante, 1927.
5. R. W. Church, Dante and Other Essays, 1988.
6. U. Cosme, Handbook of Dante Studies, 1950, Eng. Tr., David Moore.
7. B. Croce, The Poetry of Dante, Eng. Tr., D. Ainslxy, 1922.
8. P. D. Entreves, Dante as a Political Thinker, 1952.
9. F. Fergusson, Dante's Drama of the Mind, 1953.
10. T. S. Eliot, Dante, Selected Essays, 1932.
11. J. B. Fletcher, Symbolism of the Divine Comedy, 1921.
12. E. Gardner, Dante's Ten Heavens, 1904.
13. E. Gardner, Dante and the Mystics, 1913.
14. A. H. Gilbert, Dante's Conception of Justice, 1925.
15. E. Gilson, Dante : The Philosopher, Eng. Tr., David Moore, 1948.
16. I. Goldberg, Dante : An Aesthetic View, 1923.
17. C. H. Grandgent, Discourse on Dante, 1924.
18. C. H. Herford, 'Dante and Milton', Post-war Mind of Germany and Other European Studies, 1927.
19. F. J. Mather, The Portrait of Dante, 1921.
20. Angelina La Piana, Dante's American Pilgrimage, 1948.
21. George Santayana, Three Philosophical Poets, 1910.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

22. Charles Singleton, Commedia : Elements of Structure, 1954.
23. B. Stambler, Dante's Other World, 1957.
24. Toynbee, Dante Studies and Researches, 1921.
25. J. H. Whitefield, Dante and Virgil, 1948.
26. P. Wickstead, Dante and Aquinas, 1913.
27. P. Wickstead, From Vita Nueva to Paradise, 1922.
28. Erich Auerbach, Dante, Eng. Tr., Ralph Manein, The University of Chicago Press, 1961.
29. Dorothy Sayers, Hell/Purgatory / Paradise in the Three Penguin Classics Series on The Divine Comedy.
30. Charles Williams, The Figure of Beatrice, Faber.
31. Joseph Lecler, The Two Sovereignties, 1952.
32. C. S. Lewis, The Allegory of Love, O. U. P., 1938.
33. M. A. Orr, Dante and the Medieval Astronomers, Gale and Inglis, 1913.
34. Dorothy L. Sayers, Introductory Papers on Dante, Methuen, 1954.
35. Etienne Gilson, The Spirit of Medieval Philosophy, Eng. Tr., A. H. C. Downes (Shed and Ware 1950).
36. Kenelm Foster, The life of St. Thomas Aquinas, 1959.
37. Kenelm Foster, The Two Dantes and Other Studies, Darton, 1977.
38. Dean Church, Eassay on Dante in the Volume 'Dante and S. Anselm' Routledge.
39. D. J. B. Howking, A Sketch of Medieval Philosophy (Shed and ward 1946).
40. S. J. Curtis, A Short History of Western Philosophy in the Middle Ages, MacDonald, 1950.


○ ○ ○








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ऋषितुल्य संशोधक – डॉ. सांकलिया

सुरेश र. देशपांडे

१९७३ साल असेल. मी डेक्कन कॉलेजमध्ये शिकत होतो. एके दिवशी माझ्याबरोबर एक मित्र प्राचीन नाणी घेऊन कॉलेजवर आला होता. त्या वेळी डेक्कन कॉलेजवर शाही पाहुण्यांच्या स्वागताची तयारी चालू होती. त्या प्रसंगाला उचित असा भव्य मंडप आणि व्यासपीठ उभारणीचे काम अंतिम टप्प्यावर होते. चार-पाच कर्मचाऱ्यांच्या घोळक्यात किरकोळ शरीरयष्टीची, साधा नेहरू शर्ट आणि पायजमा घातलेली एक वामन-मूर्ती काहीशा आर्जवी आवाजात तेथील कर्मचाऱ्यांना सूचना देत होती. अनोळखी माणसाला ती त्यांच्यापैकीच एक वाटावी, इतका साधेपणा त्या व्यक्तीच्या चालण्या-बोलण्यात व्यक्त होत होता. मी मित्राला म्हणालो, "ते बघ सर. तुला भेटायचं ना त्यांना." त्यावर तो आश्चर्याने म्हणाला, "काय म्हणतोस ? हेच ते डॉ. सांकलिया ! " लहान मूर्ती नि कीर्ती मोठी, असे डॉ. हसमुख धिरजलाल सांकलियांचे व्यक्तिमत्त्व होते. पुरातत्त्वविद्येसाठी "मी जन्माला आलो" असं "बॉर्न फॉर आर्किऑलॉजी" या आत्मचरित्रात अभिमानाने सांगणारे सांकलिया यांचा जन्म धार्मिक परंपरा असणाऱ्या मध्यमवर्गीय गुजराती कुटुंबात मुंबईला १० डिसेंबर १९०८ रोजी धिरजलाल व मोतीगौरी या दांपत्याच्या पोटी झाला. लहानपणी त्यांच्यावर जैन धर्माचे संस्कार–विशेषतः अहिंसा आणि सात्त्विक आहार, हे–झाले. त्यांचे पालन त्यांनी कटाक्षाने पुढील आयुष्यात केले, ते एवढे की बोलूनसुद्धा एखाद्याला त्यांनी कधी दुखविल्याचे ऐकिवात नाही.

त्यांचे बहुतेक सर्व शिक्षण मुंबईतच झाले. संस्कृत विषय घेऊन ते बी. ए. झाले (१९३०). नंतर प्राचीन भारतीय इतिहास हा विषय घेऊन ते मुंबई विद्यापीठातून पहिल्या वर्गात एम. ए. झाले (१९३२). विद्यार्थिदशेत त्यांनी लोकमान्य टिळकांचा "आर्क्टिक होम इन द वेदाज" हा संशोधनात्मक ग्रंथ वाचला. त्याचा नकळत अभ्यासही केला. त्यांच्या संशोधन वृत्तीला त्यामुळे चालना मिळाली. तेव्हापासून वेद, पुराणे, भारतीय संस्कृती या विषयांचा ध्यास त्यांनी घेतला. सांकलिया जरी उत्तरायुष्यात आंतरराष्ट्रीय कीर्तीचे पुरातत्त्वज्ञ म्हणून प्रसिद्धीस आले, तरी पूर्वायुष्यात त्यांना अनेक टक्केटोणपे खावे लागले. मॅट्रिकला पहिल्या वर्षी ते नापास झाले. एम्. ए. नंतर मुंबई लोक-आयोगाने त्यांना साहाय्यक अधिव्याख्यात्याची जागा नाकारली आणि सर्वांत गंमतीची गोष्ट म्हणजे पुरातत्त्व सर्वेक्षण खात्याने त्यांना साध्या अधीक्षकाच्या जागेसाठीसुद्धा साफ नकार दिला. तेथेही त्यांच्या खटपटीला यश आले नाही. अखेर निराश होऊन डॉ. फादर हेरास यांच्या सल्ल्यानुसार त्यांनी लंडन विद्यापीठात जाऊन संशोधन-अभ्यास करण्याचे ठरविले. फादर हेरास हे गाढे विद्वान व भारतीय संस्कृतीचे व्यासंगी अभ्यासक होते. कॉलेजमध्ये असताना सांकलियांवर त्यांच्या विद्वत्तेचा पगडा बसला होता. म्हणून त्यांनी दिलेला लंडन विद्यापीठात जाण्याचा सल्ला मान्य करून सांकलियांनी डॉ. के. डी. बी. कॉड्रिंग्टन यांच्या सुविद्य मार्गदर्शनाखाली पीएच्. डी. साठी पुरातत्त्वविद्यांतर्गत संशोधन-चिंतन केले आणि एक अभ्यासपूर्ण प्रबंध सादर केला. त्यांना डॉक्टरेट ही उच्च पदवी मिळाली (१९३७). यानंतरही त्यांना एक– दोन वर्षे नोकरीसाठी पुन्हा भ्रमंती करावी लागली. याच सुमारास त्यांनी मुंबईच्या मार्फतिया या गुजराती कुटुंबातील सरलादेवी या युवतीशी विवाह केला (१९३८). सरलाबेन त्यांच्या संशोधनकार्यात रस घेत आणि प्रसंगोपात्त त्यांना मदत करीत. त्यांना संतती अशी झाली नाही, पण या दांपत्याने सर्व शिष्यगण ही जणू आपली लेकरेच मानली होती. नंतर ते पुण्याला डेक्कन कॉलेजमध्ये प्राध्यापक म्हणून रुजू झाले (१९३९). त्यांनी पुरातत्त्वविद्या हेच जीवितकार्य ठरविले आणि आपले वास्तव्यही त्यांनी डेक्कन कॉलेजच्या परिक्षेत्रातच ठेवले. याच महाविद्यालयातून

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

–खरे तर संशोधनसंस्थेतून– ते १९७३ मध्ये लौकिक दृष्टचा निवृत्त झाले. तेथे त्यांनी प्राध्यापक, उपसंचालक आणि शेवटची तीन वर्षे संचालक म्हणून काम केले. त्यानंतरही त्यांची गुणश्री प्राध्यापक म्हणून डेक्कन कॉलेजमध्येच नियुक्ती करण्यात आली. अखेरपर्यंत ते या संशोधन संस्थेत संशोधन–अभ्यास–लेखनात मग्न असत.

डेक्कन कॉलेजला आंतरराष्ट्रीय मान्यता प्राप्त करून देण्यात डॉ. इरावतीबाई कर्वे व डॉ. एस्. एम्. कात्रे यांच्या इतकेच डॉ. सांकलिया यांना श्रेय द्यावे लागेल. किंबहुना या दोघांपेक्षा डॉ. सांकलिया डेक्कन कॉलेजशी अधिक एकात्म पावले होते आणि डेक्कन कॉलेज म्हणजे डॉ. सांकलिया असे जणू एक समीकरणच बनले होते. डेक्कन कॉलेज ही संस्था त्यांनी कर्मभूमी मानली आणि तिचे अक्षरशः गुरुकुलात रूपांतर केले. तियला पुरातत्त्वविभाग हा संग्रहालय, विविध संबद्ध शाखा, अद्ययावत सुखसोयी आणि भव्य व प्रशस्त इमारत या सुविधांनी त्यांनी सुसंपन्न केला. आपण लावलेले छोटेसे रोपटे 'याची डोळा याची देही' वटवृक्ष झाल्याचे पाहण्याचे भाग्य त्यांना लाभले. पन्नास वर्षांच्या प्रदीर्घ कारकीर्दीत त्यांनी संशोधक–अभ्यासकांच्या तीन पिढ्यांची शिष्यपरंपरा निर्माण केली आणि प्रत्येक सुज्ञ शिष्यावर एकेका शाखेची स्वतंत्र रीत्या जबाबदारी सोपविली. त्यांच्या मार्गदर्शनाखाली काम करीत असताना त्यांच्या अनेक विद्यार्थ्यांना सांकलियांच्या कुटुंबवत्सल प्रेमाची प्रचीती येई. ते कधी कुणावर टाकून बोलल्याचे वा भांडल्याचे ऐकिवात नाही. पुरातत्त्वशास्त्र ही केवळ मूठभर संशोधकांची मक्तेदारी न राहता हे उच्चस्तरीय ज्ञान जनसामान्यांपर्यंत पोचविणे आणि या शास्त्राचा सर्वत्र प्रसार करणे, हे आपले कर्तव्य आहे, अशी त्यांची धारणा होती.

डॉ. सांकलियांनी जगभर प्रवास करून अनेक इतिहासप्रसिद्ध स्थळांना भेटी दिल्या आणि अनुभवांचे मूल्यवान गाठोडे बांधले. पुण्याजवळ भोसरी येथे ऐतिहासिक दफनभूमीचा शोध लावून त्यांनी आपल्या साक्षेपी संशोधनकार्यास कर्मभूमीतच प्रारंभ केला आणि हे कार्य अव्याहत जन्मभर अंगीकारले. भारतातील पश्चिम, दक्षिण व मध्य हिंदुस्थानातील सुमारे वीस प्रसिद्ध प्राचीन स्थळांच्या उत्खननांत त्यांनी व्यक्तिशः भाग घेतला आणि सर्व संशोधनाला शब्दबद्ध करून ग्रंथांद्वारे चिरस्थायित्व दिले. पुरातत्त्वविद्यांतर्गत पुराभिलेखविद्या, नाणकशास्त्र, वास्तुशास्त्र, मूर्तिविज्ञान इत्यादी प्राचीन भारतीय इतिहासाशी संबद्ध असलेल्या सर्व शाखांत त्यांना गती होती आणि या शाखांतील संशोधन एकांगी होऊ नये, म्हणून ते नेहमी जागरूक असत. प्रागितिहास ही ज्ञानशाखा त्यांनी विशेषत्वाने फुलविली तरी इतर संबंधित शाखांवरील लेखनही तितकेच समर्थपणे आणि अधिकारवाणीने केले. भारतातील आदिमानवाच्या वसाहती, त्यांची आयुधे, त्यांची राहणी, कला, धार्मिक समजुती यांवर त्यांनी संशोधन करून इतिहासामध्ये फार मोलाची भर घातली आहे. त्यांचे सर्वेक्षण-संशोधनाचे अहवाल काटेकोर व तपशीलवार असून संशोधनात्मक निष्कर्ष सबळ पुराव्यांच्या आधारे मांडलेले असत. प्रसिद्ध ब्रिटिश पुरातत्त्वज्ञ मॉर्टिमरव्हिलर यांचे प्रारंभी त्यांस मार्गदर्शन लाभले. त्यांनी त्यांचीच चिकाटी, तर्कशुद्ध मांडणी आणि विश्लेषणात्मक पद्धती यांचे अनुकरण केले. सांकलियांचे नावडातोली, ब्रह्मपुरी, नेवासे, लांघणज, आहाड, जोर्वे, त्रिपुरी, टेकलकोटा, नासिक, द्वारका, इनामगाव इत्यादी ठिकाणचे उत्खननात्मक संशोधन त्यांनी लिहिलेल्या अनेक ग्रंथांतून दृग्गोचर होते. प्राचीन भारतीय संस्कृतीचे दर्शन त्यात घडते, तद्वतच भारतीय इतिहासासंबंधीची नवीन माहिती उजेडात आलेली आढळते. त्यामुळेच त्यांचे हे संशोधन महत्त्वपूर्ण ठरले आहे. पन्नास वर्षांपूर्वी पुरातत्त्वविद्या म्हणजे काय आणि त्यातील संशोधन म्हणजे नेमके काय असते, यांविषयी सामान्य लोकांना फारशी माहिती नव्हती. विस्तृत इतिहासाचे धागेदोरे नव्याने काढणे, हे पुरातत्त्वज्ञाचे काम असते. ते काम त्यांनी चोख बजावले आणि पुरातत्त्वाचे बीज याच भूमीत पेरून त्याचा गगनावर वेलू चढविण्याचे महत्कार्य केले. या सर्वांवर मात त्यांनी १९८३ मध्ये डेक्कन कॉलेजजवळ पाषाणयुगीन वस्तीच्या लावलेल्या शोधाने झाली. हे त्यांचे अखेरचे मौलिक उत्खनन-संशोधन.

डॉ. सांकलियांनी विपुल लेखन केले आणि तेही प्रामुख्याने इंग्रजीमधून. त्यांची सुमारे तीस इंग्रजी पुस्तके आहेत. गुजराती व मराठी या प्रादेशिक भाषांत, तसेच हिंदी भाषेतही त्यांनी काही स्फुट लेख व पुस्तिका लिहिल्या आहेत. यांशिवाय विविध चर्चासत्रे व परिषदांतून त्यांनी सुमारे दोनशेच्यावर संशोधनात्मक लेख शोधनिबंधांच्या स्वरूपात सादर केले. त्यांच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रमुख अहवालात्मक ग्रंथांपैकी अर्किऑलॉजी ऑफ गुजरात, अर्किऑलॉजी ऑफ इंडियन युनिव्हर्सिटीज, एक्सकेव्हेशन्स ऑफ महेश्वर अँड नावडातोली, रिपोर्ट ऑन द एक्सकेव्हेशन्सअॅट नासिक अँड जोर्वे (सहलेखक–शां. भा. देव), एक्सकेव्हेशन्स अॅट ब्रह्मपुरी–कोल्हापूर (सहलेखक–एम्. जी. दीक्षित) इत्यादी अहवाल मौलिक असून त्यांतून त्यांनी प्रागितिहासिक काळातील भिन्न संस्कृतींविषयी अनुमाने मांडली आहेत. उत्खनित उपलब्ध अवशेषांतून अनेक महत्त्वाच्या गोष्टी उजेडात आल्या आणि प्राचीन इतिहासावर नवा प्रकाश पडला. तसेच पूर्वीच्या काही चुकीच्या अनुमानांविषयी दुरुस्ती करणे सहज शक्य झाले आणि ज्ञात इतिहासातील काही अनुमानांना पुष्टी मिळाली. याशिवाय त्यांनी प्रीहिस्टरी अँड प्रोटोहिस्टरी इन इंडिया अँड पाकिस्तान (१९६३), स्टोन एज टूल्स (१९६४), गोदावरी पॅलिओलिथिक इंडस्ट्री (१९५२), इंडियन अर्किऑलॉजी टू-डे (१९६२) इत्यादी महत्त्वाचे ग्रंथ लिहिले असून 'महाराष्ट्रातील पुरातत्त्व' ही उपयुक्त मराठी पुस्तिका लिहिली. यांशिवाय महाराष्ट्रातील आदिमानव, लोहयुग, नेवासे यांवरही मराठीत लहानलहान पुस्तिका लिहिल्या. त्यांची काही अनुमाने भारताच्या प्रागितिहासावर प्रकाश टाकतात. नावडातोली येथील उत्खननात त्यांना तांबडया रंगाची, काळया रंगाने नक्षी काढलेली माळवा पद्धतीची मृत्पात्रे-विशेषतः वाडगे, कप, तिवई असलेल्या थाळया व मद्याचे चषक आणि पन्हाळीसारखी तोटी असलेली बहुविध पात्रे–मिळाली. अशा प्रकारचे वाडगे आणि चषक इराणमध्ये टेपे-हिस्सार किंवा टेपे-सियाल्क या ठिकाणी मिळाले. त्यामुळे हा संपर्कदुवा जुळविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. तसेच या वस्तीच्या अखेरच्या काळामध्ये एका नव्या तऱ्हेची मृत्पात्रे वापरात असल्याचे त्यांना दिसून आले. ही मृत्पात्रे महाराष्ट्रातील जोर्वे या ठिकाणी प्रथम मिळाली, म्हणून त्यांना जोर्वे मृत्पात्रे म्हणतात. नावडातोलीच्या संस्कृतीचे राजस्थान व महाराष्ट्र या विभागांतील ताम्रपाषाणयुगीनांशी घनिष्ठ संबंध आले. त्याचप्रमाणे ब्रह्मपुरी (कोल्हापूर) येथील उत्खननात रोमन देवतांचे पुतळे, ब्रॉंझची भांडी, रोमन पुतळया, काच-सामान, मद्यकुंभ (अॅम्फोरा) इत्यादी रोमन बनावटीच्या विविध वस्तू मिळाल्या; त्यावरून त्यांनी कोल्हापूरचा प्राचीन काळी रोमन साम्राज्याशी व्यापार असावा, असा निष्कर्ष काढला. 'प्रीहिस्टरी अँड प्रोटोहिस्टरी इन इंडिया अँड पाकिस्तान' हा त्यांच्या पुरातत्त्वीय संशोधनाचा सारभूत बृहद्‌ग्रंथ. या ग्रंथात त्यांनी आपल्या वीस वर्षांच्या मौलिक संशोधनाचे चिकित्सक पुनर्विलोकन केले असून त्यात अश्मयुगाच्या भिन्न कालखंडांतील संस्कृतींचा अचूक आढावा घेतला आहे. या आढाव्यात संक्रमणकाळात जे बदल विशेषत्वाने प्रागितिहास व आद्य-इतिहास या संकल्पनांच्या संदर्भात घडत गेले, त्यांचा ऊहापोहही केला आहे. कार्बन–१४ पद्धतीनुसार त्यांनी उपलब्ध साधन-सामग्रीवरून भारतातील अनेक संस्कृतींचे काल निश्चित केले आहेत.

त्यांना अनेक आंतरराष्ट्रीय तसेच राष्ट्रीय मान-सन्मान व पुरस्कार मिळाले आणि त्यांचा सदस्य-अध्यक्ष या नात्यानेही अनेक जागतिक व भारतीय मान्यवर संस्थांशी संबंध आला. रॉयल एशिअॅटिक सोसायटी (मुंबई), इंडो-पॅसिफिक प्रीहिस्टरी असोसिएशन (कॅनबेरा–१९७६), हेरास इन्स्टिटयूट–सेंट झेवियर्स कॉलेज (मुंबई–१९७७), इंडियन सोसायटी फॉर प्रीहिस्टॉरिक स्टडीज (१९७७) इत्यादी मान्यवर संस्थांचे ते सभासद होते. त्यांना चक्रवर्ती रौप्यपदक (१९७२), रॉबर्ट ब्रूस फुट प्लाक (कलकत्ता विद्यापीठ), कॅंबेल स्मृति-सुवर्णपदक (१९८५) आणि 'पद्मभूषण' हा भारत सरकारचा पुरस्कार (१९७४) हे दुर्मिळ मान मिळाले. यांशिवाय अहमदनगर नगरपरिषद, पुणे महानगरपालिका, दैनिक सकाळ वगैरे सामाजिक संस्थांनी त्यांना मानपत्र दिले. भारत सरकारने त्यांना जवाहरलाल नेहरू छात्रवृत्ती देऊन त्यांचा गौरव केला. त्यांच्या 'पुरातत्त्व आणि रामायण' या ग्रंथाला दहा हजार रुपयांचे पारितोषिक मिळाले.

त्यांची नंतरच्या काळातील 'इंट्रोडक्शन टू अर्किऑलॉजी' (१९७१), 'अर्किऑलॉजी अँड रामायण' (१९७६), 'डॉन ऑफ सिव्हिलायझेशन इन अनडिव्हायडेड इंडिया' आणि आत्मचरित्र 'बॉर्न फॉर अर्किऑलॉजी' (१९७८) ही विद्वत्तापूर्ण पुस्तके प्रसिद्ध झाली. रामायण आणि महाभारत ही दोन महाकाव्ये हा आपला महान सांस्कृतिक वारसा आहे, या मताचे ते होते. त्यांनी प्राचीन स्थलनामे आणि पौराणिक व्यक्तिनामे यांचा ऐतिहासिक भूगोल आणि सांस्कृतिक मानवजातिवर्णन यांच्या पुनर्बांधणीसाठी







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उपयोग केला आणि पुरातत्त्वीय अवशेषांद्वारे त्यांची ऐतिहासिकता पडताळून पाहण्याचा उपक्रम सुरू केला. त्यामुळे पुराणे, रामायण, महाभारत यांत उल्लेखिलेल्या स्थळांची ओळख पटण्यास खूपच मदत झाली. प्राचीन साहित्याचा हा डोळस अभ्यास केल्याने आपल्या प्राचीन सांस्कृतिक जीवनाचे दर्शन होऊ शकेल, असे त्यांना मनोमन वाटत असे. त्यांचा संस्कृतचा व्यासंग मोठा होता. त्यातूनच रामायणाचे पुरातत्त्वीय विश्लेषणातून केलेले अभिनव चिंतन उभे राहिले. जैन साहित्य, पुराणे, रामायण, महाभारत यांचा त्यांनी सखोल अभ्यास केला आणि आपल्या विद्यार्थ्यांकडून तो करवून घेतला. या सर्वांमागे संस्कृत भाषेवरील प्रेम आणि भारतीय संस्कृतीवरील नितान्त निष्ठा या गोष्टी होत्या. त्यामुळे वैज्ञानिक चिकित्सक वृत्ती व पुरातत्त्वीय दृष्टी जागृत ठेवूनही त्यांचे संस्कारक्षम मन कधीही अश्रद्ध झाले नाही.

रामायण-महाभारतासंबंधीचे त्यांचे काही निष्कर्ष परंपरागत अनुमानांचा विचार करता धक्कादायक ठरले आहेत. त्यांपैकी आताची श्रीलंका ही रामायणातील लंका नसून रावणाची लंका मध्य प्रदेशात होती, असे अनुमान त्यांनी अवशेषांच्या आधारे मांडले. तसेच रामाने नर्मदाही पार केली नव्हती, द्वारका ही श्रीकृष्णाने वसविली नाही, इत्यादी मते विवाद्य ठरली; मात्र त्यासाठी ते पुरावे दाखवीत असत. त्यांच्या पुस्तकांतून व्यक्त झालेली त्यांची मते विवाद्य असली आणि सर्वमान्य झाली नाहीत; तरी त्यांच्या संशोधनाचे मूल्य कमी होत नाही. त्यांची अनुमाने ही पुरातत्त्वीय आधारांद्वारे केलेली विधाने आहेत. अधिक संशोधन त्या बाबतीत उपयुक्त ठरेल.

निवृत्तीनंतर ते गुणश्री प्राध्यापक म्हणून डेक्कन कॉलेजमध्ये संशोधन-लेखन करू लागले. त्यांना यासाठी जवाहरलाल नेहरू विद्यापीठाने तसेच लंडनच्या ब्रिटिश अकॅडमीने छात्रवृत्ती दिली होती (१९८५). अखेरपर्यंत ते कार्यमग्न होते. कोणतेही काम ते नव्या उत्साहाने करीत. साधीसुधी, घरातली शरीरश्रमाची कामे करण्यातही त्यांना कधी कमीपणा वाटला नाही. त्यांचे राहणीमान अगदी साधे आणि स्वावलंबी होते. स्वतःची सारी वैयक्तिक कामे ते स्वतः करीत, पण साधेपणा म्हणजे गबाळेपणा, असे त्यांच्या बाबतीत कधीही झाले नाही.

वृद्धापकाळाने त्यांचे पुणे येथे २८ जानेवारी १९८९ रोजी निधन झाले. त्यांनी आपल्या मृत्युपत्रात देहदान केले होते; तथापि त्यांच्या नातेवाईकांनी त्यांचे दहन केले.

पुरातत्त्वविद्या हे शास्त्र जनसामान्यांपर्यंत पोचविणारा एक क्रियाशील विद्वान म्हणून सांकलियांनी नावलौकिक मिळविला. भारतीय पुरातत्त्वशास्त्राच्या अभ्यासाला एक व्यापक बैठक देण्याचे काम त्यांनी आयुष्यभर केले. पुरातत्त्वविद्येच्या विविध शाखांचा अधिक चिकित्सकपणे अभ्यास व्हावा आणि संशोधनाला व्यापक बैठक प्राप्त व्हावी, म्हणून ते प्रयत्नशील होते. त्या दृष्टीने त्यांनी पुराजीवशास्त्र, पुरावनस्पतिशास्त्र, भूविज्ञान इत्यादी संबद्ध शास्त्रांचा अभ्यास केला. भारतातील प्रागैतिहासिककालीन अवशेष जगासमोर मांडून त्यांनी एक आंतरराष्ट्रीय कीर्तीचा पुरातत्त्वज्ञ म्हणून नाव मिळविले. विवेचन-प्रदर्शन-लेखन अशी जणू त्यांच्या संशोधनकार्याची त्रिसूत्रीच होती. संस्कृतच्या व भारतीय संस्कृतीच्या प्रेमातूनच ते रामायण-महाभारत या महाकाव्यांच्या अभ्यासाकडे वळले आणि पुरातत्त्वविद्येचा पाठपुरावा साक्षेपी वृत्तीने करू लागले. स्वातंत्र्यपूर्व काळात असहकाराच्या आंदोलनात ते सहभागी झाले, तद्वतच आणीबाणीच्या काळात विचारस्वातंत्र्यावरील बंधनाविरुद्ध त्यांनी पंतप्रधानांनाही पत्र लिहून नापसंती कळविली आणि आपली प्रांजळ मते मांडली. असा हा ज्ञानलालसेसाठी झपाटलेला निष्ठावान संशोधक आपल्यातून गेला, तरी त्यांच्या कार्याची प्रेरणा दीर्घकाळ लाभेल. आंतरराष्ट्रीय कीर्तीचे पुरातत्त्वज्ञ सांकलियांच्या निधनाने पुरातत्त्वविद्येसाठी जन्मलेले, त्यासाठी क्षणाक्षणाने आणि कणाकणाने झिजलेले एक समर्पित ऋषितुल्य जीवन संपले, याचे मनोमन दुःख होते.








राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अक्षरवेध

**एकविसाव्या शतकात विवेकानंद** – नारायण देसाई; मनोविकास प्रकाशन, मंत्रालयाजवळ, चर्चगेट, मुंबई ४०००३२; पृ. १२६; किं. २० रुपये

श्री. नारायण देसाई हे हाडा-पिंडाचे तत्त्वविवेचक आहेत; असे लेखक दुर्मिळ असतात. (तत्त्वनिष्ठ) परिवर्तनाचेही एक तत्त्वज्ञान होऊ शकते. यासाठी पुनर्मूल्यांकन व फेररचनेचा विचार व पुढे आचारही जरूर होतो. देसाई यांच्या ह्या नव्या पुस्तकाचा वेध घेण्याची सुरुवात पुस्तकाच्या शेवटापासून करणे सोयीचे होते. देसाई निष्कर्ष काढतात : भारतीय वैदिक व अवैदिक दर्शने एका प्रकारच्या भ्रांतीत (गोंधळात) ढकलून देतात. पाश्चात्त्य वस्तुवादी भौतिकवाद मानवी चैतन्यव्यवस्थेबाबत उदासीन असून छुप्या अराजवादात त्याची परिणती होते. असले भौतिकवादी बहुदा शून्यवादीच असतात. खरे पाहता ते 'न-नैतिकवादी' असतात. (पृ. १२६ पहा) मार्क्स व विवेकानंद यांच्या समन्वयात एकविसाव्या शतकाचे मार्गदर्शन आढळणे अटळ आहे. हे लेखकाचे नवे अंतर्ज्ञान आहे. देसाई मार्क्सच्या विचारमार्गातील आहेत. या पुस्तकाच्या प्रास्ताविकातही लेखकाने प्रारंभी, त्याची दृष्टी विवेचिली आहे. विवेकानंद हे भौतिक व आत्मिक या दोन्हीही जागृतीचे जनक होते. हिंदुधर्माच्या व मूळ वैदिक धर्माच्या विकासाच्या वाटचालीत व एकूण शुद्धीकरणात विवेकानंद यांचे स्थान वगळून चालणार नाही. आत्मजागृतीकडे दुर्लक्ष करणारी समाजक्रांती अनर्थकारी आहे, हे लेखकाने प्रथम प्रतिपादिले. समाजवादी विचारदेखील विवेकानंदांत आहेत. (प्रस्तावना पृ. ४) मार्क्स व विवेकानंद यांच्या 'भौतिक-आत्मिक' विवेकवादी शिकवणुकीकडे दुर्लक्ष झाल्यामुळे स्तालीन, माओ, पोलपाट आदी क्रांतिकारकांच्या हातून संस्कृतिविकासाच्या कार्याला काळिमा लावणारे गुन्हे घडले. कदाचित यामुळे एम. एन. रॉय, डॉ. आंबेडकर हे मार्क्सच्या विचारांचे अभ्यासक असूनही, ते दूर राहिले. सांप्रदायिक व केवळ पुनरुज्जीवनवादी हिंदुत्वाचा गर्व धरणारे हे सर्व अभिमानी "अस्पृश्यता, जातिवाद, अंधश्रद्धा, जुना धर्म, जुना वेदान्त, जुना भारत सोडण्याचे जे संदेश विवेकानंदांत आहेत व नवा भारत उभारण्याच्या प्रेरणा आहेत, त्याकडे मुद्दाम दुर्लक्ष करून ते सक्रिय विचारात घेत नाहीत." (प्रस्तावना पृ. ६) उलट विवेकानंदांना आकुंचित हिंदुत्ववादात कोंडण्यात येते, म्हणून त्यांचे विशालत्व सिद्ध करणारे हे पुस्तक म्हणजे एक नवे अंजन आहे. विवेकानंदांचा हिंदुधर्म व राष्ट्रवाद अखिल मानवत्वावर अधिष्ठित होता.

लेखकाने समाजवादी संघर्ष हवाच हवा असे म्हणून विवेकानंदांचा सम्यक प्रकृत्यात्मवादाचा मार्ग स्वीकारला आहे. (प्रस्तावना पृ. ७) "कच्च्या भौतिकवादाने (Crude Materialism) काही साधत नाही असा आमचा अनुभव आहे." (प्रस्तावना पृ. ७) असे खुद्द लेखक त्यांच्या स्वतःच्याच प्रस्तावनेत निष्कर्ष काढतात.

पुस्तकाची छपाई सुंदर आहे. मुखपृष्ठावर विवेकानंदांचे देखणे चित्र आहे. मागील पृष्ठावर लेखकाचे रेखाचित्र आहे. पुस्तकाच्या ह्या मागच्या बाजूस लेखकाची थोडक्यात ओळख करून दिली आहे. शुद्धलेखन–सुबोध भाषा, बांधीव व योजलेले आणि आखलेले परिच्छेद, व बाह्य सजावटदेखील आकर्षक आहे.

'एकविसावे शतक, विवेकानंद आणि आपण' हा पहिला विभाग आहे. 'नवीनाच्या रेटचाखाली आपण ढकलले जात आहोत?' असा लेखकाचा प्रश्न आहे.

विभाग १ मध्ये पुरोगामी कोण, याची चिकित्सा केली आहे. 'पुढे–पुढे जा. भारतीया, पुढे जा' असे तत्त्वशोधक पुरोगामी विवेकानंद सांगतात. Matter is your servant, not you the servant of matter असे केवळ जडवाद्यांना उद्देशून विवेकानंद प्रतिपादितात. शिक्षणाने आत्मविश्वास निर्माण केला पाहिजे. माणसात असणारे अव्यक्त ब्रह्म याचा सार्व-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जनिक शिक्षण व समाज यांच्याशी त्यांनी अतूट संबंध जोडला. तरी विवेकानंद धर्मसंप्रदायवादी झाले नाहीत. बुद्धाची विशेष प्रशंसा विवेकानंदात आहे. पण ते बुद्ध-संप्रदायवादी व त्या धर्माचेच धर्मवादी झाले नाहीत. विवेकानंद मानवजातीय उत्क्रांती मानीत होते. (पृ. १३) विवेकानंदांचे विशाल दर्शन पानोपानी मिळू शकते.

" विवेकानंदांबरोबर मार्क्स व मार्क्सबरोबर विवेकानंद आत्मसात केला पाहिजे " (पृ. १६) या समन्वयवादाचा प्रयत्न लेखक करतात. २१ व्या शतकाकडे जाण्याच्या दृष्टीने पुस्तकाचे कर्ते विवेचन मांडीत पुढे जातात. 'प्रेयस व श्रेयस' ही दोन मूल्ये विवेकानंद मानतात.

श्री. नारायण देसाई यांनी पंचवीस वर्षांपूर्वी विवेकानंदांमध्ये 'समाजवाद' शोधला होता, व विवेकानंदांवर त्यांचे यासंबंधीचे विवेचक पुस्तकही आहे. (पृ. २०)

मार्क्सविचाराचा पुढचा विकास याचीदेखील जरुरी श्री. देसाई यांनी निवेदिली आहे. 'पुढे सामाजिकतेला धरून मनुष्याचे व्यक्तित्व हा विवेकानंदांच्या विचाराचा पाया आहे. सांप्रदायिक वेदांताच्या जागी नववेदांताचे प्रतिपादन विवेकानंदांत आहे. पुरोहितवादाला 'खुळचट' हे बिरुद स्वामी विवेकानंदांनी लाविले होते. (पृ. २३) अधूनमधून डॉ. आंबेडकरांच्या भूमिकेसंबंधी जाताजाता मते लेखक व्यक्त करतात. उदा., " डॉ. आंबेडकरांचा भिक्कुविरोधही कमी नव्हता" (पृ. २३ ) असे लेखक प्रतिपादितात. पृ. १४ वर 'राष्ट्रातील बहुजनसमाज शिक्षित व सुविद्य बनेल तर राष्ट्र पुढे जाईल' हा विवेकानंदांचा विचार उद्धृत केला आहे. विवेकानंदांची विलायतेतून आलेली पत्रे वाचली तर विवेकानंदांत ज्योतिबा फुले दिसतात. मात्र प्रसन्न भाषेत धर्मसुधारणेचे विपुल विचार विवेकानंदांच्या इतरही लिखाणात आहेत. ह्या म. फुले यांच्या सादृश्याचा विचार श्री. नारायण देसाई यांना पुढे उमजलेला दिसतो. म. फुले व आंबेडकर यांच्या अनुयायांनी हे पुस्तक जरूर वाचावे. कारण राममोहन ते विवेकानंदअखेर बंगाल्यात मोठमोठे धर्म-प्रवर्तक व सुधारक झाले. हे सर्व अर्वाचीन प्रबोधन व 'फुले–आंबेडकर' यांची ताटातूट करून घेतलेला शोध व बोध थिटा पडतो.

मार्क्स व विवेकानंद यांच्यामधील साम्य प्रस्थापित करताना अनेक पाश्चात्त्य व निवडक पौर्वात्य व प्राचीन ग्रंथांतील उतारे आधारार्थ घेतले आहेत. सिद्धान्त घट्ट करताना सिद्धान्तावरील विवेचनात थोडीफार पुनरुक्ती अटळपणे येत असलेली आढळते.

विभाग एक मध्ये एकूण आठ मुद्दे विचारार्थ निवडले आहेत. त्यांतील 'आज स्त्री सर्वप्रथम' हा मुद्दा (पृ. २४) देसाईंनी घेतला आहे. मैत्रेयी, रूना, लीलावती, सावित्री, उभयभारती वगैरे वैदिक काळातील असामान्य स्त्रिया विचारप्रवर्तक ऋषींच्यापेक्षा संख्येने जास्ती होत्या. (पृ. २४) पण त्याही काळात खेड्यापाड्यांतील आर्येतर, द्रविड, व एकूण शूद्रातिशूद्र स्त्रिया बहुसंख्येने निरक्षर होत्या. ही अवस्था पुढे अनेक शतके राहिली. वैदिक काळातील वरील असामान्य स्त्रिया म्हणजे अपवादात्मकच होत्या व अपवादावरून नियम बांधता येत नाही. ग्रंथांतून आढळणारे समाजाचे स्वरूप व वास्तविक वस्तुस्थिती यात महदंतर होते व असू शकते. स्वामी विवेकानंदांच्या मध्ये स्त्री-जीवनाचा विचार आहे : स्त्रियांना स्वतःचे आत्मजीवन व आत्मविकसन आहे. (पृ. २४)

चैतन्याला प्राधान्य देऊन आजवर येथे व सर्व जगात अमाप विचार झाला व होतही असतो. जडाला त्याहीपेक्षा प्राथम्य व मूलभूत समजून नव्या वैज्ञानिक जगात विचार जास्ती होत असतो. पण श्री. देसाई यांनी जड–चैतन्याचा संयुक्त असा सारासार विचार केला आहे. लेखक दोन्हीही बाजू तपासून पुढे जात आहेत. दोहोमधील दुरुपयोग त्यांनी स्पष्ट केला आहे. (पृ. ८)

विवेकानंदांचे चरित्र, काळ व कार्य यांपेक्षा त्यांच्या मूलभूत तत्त्वज्ञानावर हे पुस्तक जास्तीत जास्तपणे प्रकाश टाकते. असा व्यापक विवेक खुद्द 'रामकृष्ण–विवेकानंद' यांच्या भक्तांनी केलेला दिसत नाही. उदा., विभाग २ मध्ये सैद्धांतिक गुन्हेगारी, अर्थोत्पादन सर्वोपरी, अंतःकरण मुख्य संचित या मुद्द्यांवर विवेचन केल्यावर शेवटी 'धर्मसंप्रदायाचा पाया धादान्त खोटा' हा परिच्छेद येतो. येशूला देवपुत्र बनविण्यासाठी त्याच्या चहात्यांनी खोटी व विपर्यस्त जीवनकथा रचली; यापेक्षा उपनिषद्कार कितीतरी सरस, हा तुलनात्मक विवेक श्री. नारायण देसाई हे व्यक्त करतात. (पृ. ४१) युरोपात धर्मसंप्रदायवाद्या-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विरुद्ध 'शॉ' वगैरे अनेक साहित्यिकांनी लढा दिला. विभाग ३ मध्ये विवेकानंदांना 'अ-संप्रदायवादाचे जनक' म्हणून संबोधिले आहे. व्यक्तिवादी, समाजवादी, वर्णाश्रमधर्माचा विरोधक, श्रमजीवींचा तत्त्ववेत्ता, करुणेचा बुद्ध-ख्रिस्त नसानसांत, पुरोगामी बलवान नवभारताचा उद्‌गाता, इत्यादी एकूण सोळा मुद्दे निवडून विवेकानंदांच्या शिकवणुकीची दर्शने दिली आहेत. अर्थोत्पादन सर्वोपरी (पृ. ३५) या परिच्छेदात अर्थार्जन–संपत्ती निर्माण करणे– हेच जास्तीत जास्तपणे मनुष्याचे कर्तव्य झाले आहे. अर्थार्जन याला चार पुरुषार्थांत प्रथमचे स्थान प्रत्यक्ष व्यवहार-जीवनात आले आहे, असे भर घालून म्हणता येते. सर्वच प्रकरणांतील सर्वच परिच्छेदांतील विषयांची व विवेचनाची ओळख करून देणे येथे अशक्य वाटते. पण काही निवडले आहेत. उदा., सैद्धांतिक गुन्हेगारी (पृ.३०) या मुद्द्यावर समतोल विवेक लेखक करतात. मार्क्सवादात तत्त्वज्ञानाला जो नकार आहे त्या नकारात तत्त्वज्ञानाचे विचारधारात्मक वास्तव सार पक्के होते. (पृ. ३४)

"प्रेम, नीती व अहिंसेचा मार्ग धरून सर्वच प्रश्न सुटत नाहीत हे सर्व क्रांतिकारी व पुरोगामी सहज बोलून जातात व ते खरेही आहे. पण प्रेम, नीती व अहिंसा सोडून सर्व प्रश्न बिघडतात त्याचे काय?" (पृ. ३८) हा सवाल संपत आलेले शतक नव्या उजाडणाऱ्या पुढील शतकाला विचारत आहे.

आत्मवादात घुसलेल्या परमात्मवादाने आत्मवाद नष्टभ्रष्ट केला आहे. (पृ. ४१) आत्मवादी बुद्धाच्या धम्माला पुढे परमात्मवादी अंधश्रद्धा व सांप्रदायिक स्वरूप आले. (पृ. ४१) या दृष्टीने डॉ. आंबेडकरांच्या धर्मांतराला उद्देशून काही विधाने लेखक करतात. (उदा. पृ. ५)

या पुस्तकातील विवेचन व टोके सोडून भविष्यकाळाकडे पाहण्याची लेखकाची प्रवृत्ती अभिनव वाटते. मार्क्सवादाचे नवपरीक्षण तर विवेचनात आहेच, पण विवेकानंद म्हणजे भारताचा 'त्रिकाळ' अशी चिंत्य व्याख्या दिलेली आहे. (पृ. ४६)

भाकरीच्या नवतत्त्वज्ञानाबरोबर चिंतनशील नववेदान्तही विवेकानंद मांडतात. विवेकानंदांपूर्वी त्यांच्या जन्मभूमीत राममोहन–देवेंद्रनाथ वगैरे मोठमोठी माणसे बंगाल्यात झाली; पण त्यांनी एकेश्वरी निराकार उपास्य व उपासनेची शुद्ध रीती यांवरच जास्ती भर दिला. पण त्रैवर्णिकाकडून सर्वसामान्य बहुलोक समाजाचे शोषण करणारी आपली समाजपद्धती आहे असे सांगून, श्रमिकांची बाजू विवेकानंदांनी नंतर प्रथम घेतली. (पृ. ४७) वैज्ञानिक दृष्टया श्री. नारायण देसाई यांनी मागे त्यांच्या पुस्तकाने पुष्कळ विचारप्रपंच केला. पण हा प्रयत्न ताजा व नवा वाटतो.

प्रथमच विवेकानंदांनी 'तूच ब्रह्म आहेस' हे नव्या जगाला सांगितले. पण त्यांनी आद्य शंकराचार्यांसारखा निवृत्तिप्रधान मायावाद प्रचारिला नाही.

म. फुले जवळजवळ विवेकानंदांच्या काळात होते. त्यांना विलायतेस जाण्याची संधी प्राप्त झाली नाही. समाजवादाचे विचार त्यांच्यापर्यंत जाणे अशक्य होते; तरी भारतीय व महाराष्ट्रीय समाजातील शोषण त्यांनी व्यक्त केले आहे. 'फुले व विवेकानंद' असा विवेक लेखकाला भावला आहे. फुल्यांतही भारतीय मार्क्स सापडतो. "दैनंदिन श्रम केल्याविना ज्यांचे जडत नाही घडत नाही, ते सर्वच बहुजन समाजात मोडतात." विवेकानंदांची ही वर्गीय व्याख्या ज्योतिरावांना अभिप्रेत होती. लेखकाने विवेकानंदांना 'वर्णाश्रमधर्माचा विरोधक' म्हणून संबोधिले आहे. साधुसंतांनी वरील व्याख्येप्रमाणे जे बहुजनी होते त्यांना शीतलता प्राप्त व्हावी म्हणून विठ्ठलाचा मार्ग सांगितला व शास्त्री-पंडितांनी काल्पनिक 'ब्रह्म' हे तत्त्व म्हणून उभे करून वेद-वेदान्ताचा मार्ग दाखविला. दोघांनीही वर्णीय विषमता नाहीशी व्हावी म्हणून समाजरचना बदलण्याचा उपाय सांगितला नव्हता. स्वामी विवेकानंद साधुसंतांत मोडतात. परंतु त्यांनी नव्या काळाचा अर्थ जाणून वर्णीय विषमतेला विरोध केला. या मुद्द्यावर मात्र म. फुले–आंबेडकरांचे विवेकानंदांशी असलेले साम्य आवर्जून लेखक नमूद करतात. (पृ. ५१) करुणेच्या मार्गाने नव्हे तर संघशक्तीने श्रमजीवी जनता थैलीशहाशी मुकाबला करील. वेद-वेदान्त हे कार्य करण्यास असमर्थ आहेत. (पृ. ५५) वैयक्तिक मोक्षाचा वेदान्त स्वीकारला नव्हता. गेल्या शतकातील सुधारणावाद ब्राह्मण-क्षत्रियांपुरताच घुटमळत राहिला. तो तळागाळात नेण्याचे कार्य फुले-आंबेडकरांनी केले. शूद्र ह्या संज्ञेचा अर्थ श्रमिक असा स्वामी विवेकानंदांनी केला आहे. (पृ. ६८)

डायनवी, रोमा रोला या पाश्चात्त्य प्रतिभावंतांना व कामरोवसारख्या सोविएत तत्त्वज्ञांना विवेकानंदांचे आकर्षण होते. विवेकानंदांनी [illegible]चे ऐहिकीकरण

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

केले. ( पृ. ६२ ) तरी कोणतीही विचारविवशता ही मुख्य वैरी, असेही सांगितले. ( पृ. ६३ ) रामदास व विवेकानंद यांच्यामधील भेदही देसाई निर्भीडपणे सांगतात. ( पृ. ३२ ) या पुस्तकात अनेक मुद्दे, उदाहरणे (आधार) यांची सर्वत्र संपन्नता आहे.

विभाग चारमध्ये आतापर्यंतच्या विवेचनाला पाठिंबा देणारी खुद्द विवेकानंदांची वाणी उद्‌धृत केली आहे. धर्माचा नाश व्हावा, ही वाट विवेकानंदांना मंजूर नाही; तर "खऱ्या हिंदुधर्माचा तर्कशुद्ध विकास जो बुद्धधर्म त्याची सहानुभूती मिळविली पाहिजे." (पृ. ७२) हे कार्य डॉ. आंबेडकरांनी स्वातंत्र्य आल्यावर केले. विवेकानंदांच्या भाषेत ओज आहे. ते स्वतः कायस्थ समाजात जन्म पावल्यामुळे ( केशवचंद्र सेन यांच्याप्रमाणेदेखील ) त्यांच्या विचारांना ब्राह्मणी धर्म व ब्राह्मणी वर्चस्व यांच्या मर्यादा पडत नाहीत. चार वर्णपद्धतीची इष्टानिष्टता त्यांनी सांगितली आहे. हे विवेचन आगळेवेगळे वाटते. ( पृ. ६७ व ६८ ) स्वामीजी तसे कट्टर समाजसुधारकांत मोडत नाहीत. धर्मसुधारक खासपणे होते. विवेकानंद-रामकृष्ण मिशन्स (मठ) व खुद्द श्री. नारायण देसाई यांनी उभे केलेले विवेकानंद ह्यांत प्रत्यक्ष महदंतर वाटेल; पण विवेकानंदांची जी अधिकृत पुस्तके उपलब्ध केली आहेत, त्यांतील आधार पुस्तकात ठिकठिकाणी घेतले आहेत. खुद्द विवेकानंद व मूळ मार्क्स यांना स्थान जास्तीत जास्त दिले आहे. प्रत्येक प्रकरणापूर्वी स्वतंत्र पानावर प्रकरणात विचारात घ्यावयाचे मुद्दे दिले आहेत.

विभाग पाचवा हा लेखकाचा उपसंहार वाटतो. यातील नव्या धर्मवेडाची कारणे, मार्क्सची अद्वितीय धर्ममीमांसा, केंद्र परमात्मा नव्हे तर मानवात्मा, जितका मायासिद्धान्त भ्रामक तितकाच कच्चा भौतिकवाद, आत्मसंयमाचा विचार अपरिहार्य, पुरोगामी सत्यांच्या अपलापाविरुद्ध संघर्ष, असे महत्त्वाचे मुद्दे चर्चिले आहेत व एकूण पुस्तकाच्या विषयाला दृढता आणण्याचा प्रयत्न केला आहे. 'श्रद्धा, अंधश्रद्धा व अश्रद्धा' हे पाचव्या प्रकरणाचे नाव आहे. सर्वच पुस्तकातील विवेचन तसे सोपे नाही; तत्त्वचिंतनपर असे वाङ्‌मय विपुल नसते.

खुद्द अर्थप्रधान व अर्थप्राबल्याला धरून त्याचेच जास्ती प्रतिपादन मार्क्स व एंगल्स यांचेकडून झाले, असे विधान या दोघांना करावे लागले होते, ते पृ. ८० वर उद्‌धृत केले आहे. मार्क्सच्या विचारापलीकडे जाण्याचाही लेखकाचा मनोदय प्रकट होतो. त्याची दृष्टी 'मानवात्मा केंद्रित' आहे.

'मार्क्सची अद्वितीय धर्ममीमांसा' ह्या परिच्छेदात मार्क्सची जवळजवळ नवी ओळख घडविली आहे. धर्मचिकित्सा ही तर सर्व चिकित्सेचा पाया आहे व ती करण्यासाठी धर्माच्या खोल व विशाल अभ्यासाची सर्वांना ( निरीश्वरवाद्यांनाही ) गरज असतेच. माणसाचे जातिबंधुत्व व त्याचा मानवतावाद उत्क्रांती व क्रांतिशीलतेवर म्हणजेच इतिहासावर आधारलेला आहे. ( पृ. ८५ पहा ) "पूजा करण्यास योग्य ईश्वर म्हणजे मानवदेहस्थित आत्मा—मानवात्मा" हे राजयोग विषयावर जे विवेकानंदांनी विवेचन केले आहे, ते मार्क्सच्या समीप लेखकाने आणले आहे. ( पृ. ८६ ) लेखक जडवाद व चैतन्यवाद (अध्यात्मवाद) यांतील धोके सांगून समन्वयात्मक निष्कर्षाकडे जातो. उदा.; "कोणतेही भौतिक ज्ञान मानवाला होणे म्हणजेच त्यात आत्मिक मिसळले जाणे होय." (पृ. ९५ पहा) लेनिनचेही आधार घेतले आहेत. (पृ. ९५)

समन्वयाने पुढे वाटचाल करणे हा भारतीय संस्कृतीचा ऐतिहासिक स्वभाव आहे. या दृष्टीने हे पुस्तक सांप्रदायिक म्हणजे परंपरावादी व पुनरुज्जीवनवादी विविध हिंदुत्ववादी संघटनांनी जरूर अभ्यासावे. हिंदुधर्म हा जीवनाचा एक शोधमार्गच असल्यामुळे शंकराचार्यांनादेखील शोधक वृत्तीची जागा सरसकट वाक्यवृत्तीला ( वेदांना ) देणे शक्य झाले नाही. (पृ. १०३). पुस्तकातील एकूण विवेचन एकांगी नसल्यामुळे कोणासही अभ्यसनीय वाटावे असेच आहे. उदा., "... मार्क्सच्या पद्धतिशास्त्राचा वारंवार उल्लेख आला आहे. वास्तविक मार्क्सच्या अनेक वचनांपासून आज दूर जाता येणे शक्य आहे. पण मार्क्सच्या पद्धतिशास्त्रापासून मात्र तसूभरही हालता येणे शक्य नाही. कारण मग पुरोगामी आणि सुसंगत विचाराला आधारच उरणार नाही." (पृ. १२६) एकविसाव्या शतकात जाताना कोणते विचार त्या नव्या शतकात खास उपयोगी होतील याचा एक समन्वयात्मक अभ्यासप्रधान शोध हे पुस्तक देते. विवेकानंदांचे शिक्षणावरील विचार आवर्जून या पुस्तकात आहेत.

संप्रदायवादी व पुनरुज्जीवनवादी हिंदुत्वनिष्ठांनी विवेकानंदांना अभिमानपूर्वक शिराधार्य का धरले आहे,



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

याची कारणमीमांसा लेखकाने स्पर्शिली नाही. देवेंद्रनाथ टागोर, केशवचंद्र सेन, रामकृष्ण परमहंस व विवेकानंद यांचे मतभेद व एकमेकांचा एकमेकांवर परिणाम वगैरे धर्मसुधारणा व धर्मचिंतनाचा जो इतिहास बंगालमध्ये झाला, त्याचा ऊहापोह हे पुस्तक करीत नाही. केशवचंद्र सेन अकाली निवर्तले नाहीतर 'ते आणि रामकृष्ण–विवेकानंद' समीप येण्याचा दाट संभव होता. पण पुढे रवींद्रनाथ टागोरांनीही विवेकानंदांच्या देशकार्याविषयी धन्योद्गार काढले आहेत. राममोहन झाले नसते तर अंधारच असता, असे विवेकानंदांनी लिहिले आहे. बंगाल्यातील ब्राह्मोसमाजाचा कालानुसार जो ओढा अटळपणे पाश्चात्त्य धर्म व संस्कृती यांकडे विवेकानंद यांच्या काळात होता, तो रोखण्याचे कार्य विवेकानंदांकडून झाले. निबंधमाला व पुढे लोकमान्य यांचा (प्रार्थनासमाजासंबंधाने) हा उद्देश त्याच काळात पुढे-मागे होता. पण ह्यांच्यात विवेकानंदांएवढे पुरोगामित्व आणि पूर्व आणि पश्चिम देशांत स्वधर्माचा दिग्विजय करण्याचे विशाल सामर्थ्य नव्हते. विवेकानंदांच्या आत्मा, परमात्मा व ईश्वर यांच्यासंबंधीच्या समजुती स्वतंत्र व भिन्न होत्या. स्वामीजींचा अद्वैतवाद एकपरी स्वतंत्र आहे. खुद्द लो. टिळकांना स्वामीजींचे आकर्षण उलटपणे वाटले.

पुनर्मूल्यांकन व त्यानुसार फेररचना हा विचार रशियातून आता खुद्द सर्व जगात ऐकू येत आहे. अशा काळात लेखकाने केलेला मार्क्स व विवेकानंद यांच्यावरील फेरविचार एकूण तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांना मार्गदर्शक होईल, अशी खात्री वाटते.

विवेचन तत्त्वमूलक असल्यामुळे विवेकानंदांचा आचारधर्म, मूर्तिपूजेचे मंडन, वेद-उपनिषदे, गीता वगैरे प्राचीन ग्रंथांचा योग्य अभिमान या दृष्टीने विवेकानंद प्रत्यक्षात जास्ती आध्यात्मिक ठरतात. योग, समाधी व संन्यास वगैरे जे कित्येक मुद्दे विवेकानंदांत आहेत ते मार्क्समध्ये मुळीच नाहीत. संपूर्ण धर्मातीतता मार्क्सचा मुख्य पैलू होता. हे पुस्तक भेद व अंतर यांना दुय्यम गौण समजून, समन्वयाप्रीत्यर्थ 'मार्क्स व विवेकानंद' यांना जितक्या जवळ आणिता येते तितक्या समीप आणण्यासाठी साकार झाले आहे. शेवटचे प्रकरण तर सर्वच संकल्पित विवेचनाचे शिखर व सार आहे.

—रा. ना. चव्हाण

---

**पाण्याचे पंख** : श्रीनिवास विनायक कुलकर्णी; मौज प्रकाशन, मुंबई–४००००४; प्रथमावृत्ती–नोव्हेंबर १९८७; पृष्ठे १३४; मूल्य ४५ रुपये.

---

'डोह' आणि 'सोन्याचा पिंपळ' या दोन ललित लेख-संग्रहांनंतर श्रीनिवास विनायक कुलकर्णी बरेच दिवस पुस्तकाकारात प्रगट झाले नव्हते. जाणकार वाचकांना विशेष प्रतीक्षा लागून राहिली होती. अर्थात श्रीनिवासांनी आता त्या प्रतीक्षेच्या पदरात 'पाण्याचे पंख'च्या रूपाने अमोल अक्षरराशी उधळून दिल्या आहेत.

'पाण्याचे पंख' हा संग्रह बालांच्या सृष्टीतील भावरम्य कौतुकांचा एक लक्षणीय शब्दोत्सव ठरावा! ह्या संग्रहात एकून चौदा लेख आहेत. बहुतेक लेखांमध्ये बालरूपाच्या भव्योदात्त भावविभ्रमांचे मोठे मनःपूत चित्रण आहे. हे सर्व लेख १९६७ ते १९८४ या कालावधीत 'मौज', 'सत्यकथा', 'साधना,', 'गुलमोहर', 'हंस' इ. नामवंत नियतकालिकांत येऊन गेले आहेत. आपल्यातील कलावंताच्या आत्मरंगात खोल खोल बुडून एका संथ, नीरव आणि सहजसाध्य सृजनलयीत विसर्जित होऊन तब्वेतीने केलेले हे लेखन म्हणजे जणू काही एखाद्या लोलकाच्या ललितकोमल रंगरूपाचा नक्षीदार असा जिवंत आविष्कार. म्हणूनच या लेखनाला अक्षरलेण्यासारखी वाचकाला अभिमंत्रित करण्याची अभिजात किमया लाभली आहे. कोरीव कसबी कारागिरीचा कुठलाही लवलेश नसलेली भाग्यशाली प्रतिभा एकूण विरळाच. 'उत्तमोत्तम शब्दांचा उत्तमोत्तम अनुक्रम' ही आंग्ल कवी कोलरिजकृत काव्य-परिभाषा श्रीनिवासांच्या गद्यलेखनाला सार्थपणे लागू पडावी, ही नवलाईची गोष्ट म्हणता येईल. कवी मंगेश पाडगावकरांनी लिहिले आहे की, "बालकवींच्या प्रतिभेने जर कविता न लिहिता गद्य लिहिले असते तर ते लेखन श्रीनिवास कुलकर्णी यांचेच लेखन झाले असते." इत्यर्थ हा की, श्रीनिवासांच्या लेखनामध्ये भावनिर्भर काव्यात्मकतेचे रंग कमालीचे गूढगहिरे आहेत. यामुळे आत्यंतिक प्रभावित होऊन श्री. आनंद साधले यांच्यासारखा समर्थ साहित्यिक मोठी बोलकी नि प्रांजळ प्रतिक्रिया नोंदवताना दिसतो: "बस्स! यापुढे कुणी काही लिहायचीच जरुरी नाही. लिहावे तर असे." ('मातीची चूल', पृ. ३०९)

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आत्मनिष्ठ वेदना-संवेदनांचे विलक्षण प्रत्ययकारी सहजोत्स्फूर्त उत्कट निवेदन म्हणजे ललित गद्य. एक प्रकारे कलावंताचा आपल्या 'स्व' शी सतत चाललेला संवादच. नितळ तसाच भावपूर्ण, मुग्ध-मुखर असा शब्दसोहळा. मनाच्या गूढ गाभाऱ्यात जे काही वाऱ्या-पाऱ्यासारखे सक्रिय असते, ते जेव्हा शब्दसंपुटामध्ये सहजपणे झिरमिरत समोर येते, तेव्हा अशा लेखनाची कुंडली सर्वस्वी वेगळी आहे, हे सांगण्याची तशी गरज नसावी. जाणिवा-नेणिवांच्या सीमारेषांवर आणि चेतनावचेतनांच्या धूसर अंगणात रंगलेल्या मन-माधवाच्या भावविभोर लीलांचे शब्दांकन हे केवळ अभिजात प्रतिभेचेच सृजन असू शकते. नेहमीच्या छापील नि गद्य व्यवहारात जीवनप्रवाहातील वाळूचे विराट मैदानच तेवढे नजरेत भरते. पण, त्याखाली झुळझुळणारा अखंड झरा नक्षत्रांचे देणे लाभलेल्या दृष्टीलाच काय तो गोचर होतो. याचा पूर्ण प्रत्यय 'पाण्याचे पंख' हे पुस्तक वाचत असताना निश्चितपणे येतो. पुस्तकभर आपण कुठल्याशा दूरस्थ परीच्या साम्राज्यात अधांतरी तरंगत तरंगत चाललो आहोत, असा मधुर भास सतत होत राहतो. श्रीनिवासांचा हरेक शब्द अर्थ आणि आशयाची अवघी राने वेधत व्यापत जाताना पाहून मन कसे चिंब चिंब होते !

मुले म्हणजे देवाघरची फुले. त्यांचे ते सततचे झपाटलेपण, काहीएक गूढ वेड, काव्यमय कोवळी नीज, फुलांच्या पंखांनी उमलणारी ती त्यांची तंद्रालसयुक्त हसरी-नाचरी सकाळ. नादगंधरूपरसरंगादींकडे झेप घेणारी चिमणी मुखे, ते रंगीत-संगीतमय विश्व. उखाण्यात बोलणारी त्यांची बालवाणी, स्वप्नसृष्टीत झुलणारे-झुरणारे मन, गाराधारांचे, ऊनवाऱ्याचे पंख पकडणारे, आपल्यात हरवून गोड लयीत घुमणारे, धाव-धाव धावणारे चिमुरडे जीव, असे बरेच काहीबाही. बालसृष्टी मोठी अनोखी आणि पुष्कळदा अगम्य नि अतर्क्यही. कोड्यात टाकणारे त्यांचे ते हुंकार-हुंदके, शब्दांना हुलकावण्या दाखविणाऱ्या त्यांच्या मर्कटतुल्य मुखाकृती, सारे कसे नवलाईचे. याचा एक झगमगता सचेतन आलेख 'पाण्याचे पंख' मध्ये आलोकमय स्वरूपात आपणाला भेटतो. एखाद्या प्रशांत डोहावर वाकलेल्या वृक्षाचे पान टपकन गळून खाली यावे, पाण्याच्या असंख्य पापण्या नीरवपणे थरथरून जाव्यात, डोहाचे अवघे अंगांग निःशब्द शहाऱ्यांनी फुलावे नि चमचमत्या चंद्रप्रकाशात पाण्यालाही पंख फुटावेत... असे हे फुलांच्या पावलांनी येणारे बाल-जगतातील अनुभव प्रस्तुत संग्रहात विलक्षण सामर्थ्यानिशी साकार झाले आहेत. ते फुलपाखरांच्या चित्ताकर्षक रंगविभ्रमांइतकेच चंचल, धूसर नि नाजूक आहेत. अस्सल अनुभूती आणि चैतन्यपूर्ण आविष्कार यांचे एवढे अद्भुत रसायन खरोखर अपूर्व असे आहे. श्रीनिवासांचे हे लेखन बालमुखाइतकेच प्रसन्न, ताजे व तेजाळ आहे. दवभिजल्या फुलासारखेच टवटवीतही आहे. अपार्थिव क्षितिजापार नांदणाऱ्या रूपगंधादींच्या रहस्यमय सृष्टीशी सतत-संपर्क साधणारे कुतूहलभरले, निरागस मन लेखकाला लाभले आहे. त्याचे हृदयंगम दर्शन या लेखांमधून घडते. अर्थात हे लेखन कुणाकुणाला भाबडे वा भावविवश वाटेलही, पण तो ज्याच्यात्याच्या अभिरुचीचा भाग म्हणता येईल, इतकेच.

आपल्या भावी आणि एकूणच भावजीवनातील विकार-संस्कारांचे बीजवपन बालवयातच होत असते. आपण मात्र 'पोराला काय कळतंय !' या तीन शब्दांत सर्व बाललीला गुंडाळून टाकतो. प्रौढ, पक्व-परिणत मंडळींच्या तुलनेत बालवृन्द केवढा तरी चलाख, चतुर नि चाणाक्ष असतो. ही पाहण्यासारखी गोष्ट आहे. लौकिक व्यवहाराचे कोरडे कातडे अंगावर पांघरून वावरणाऱ्याला ही गंमत मुळी नाही कळायची. भक्त सूरदासांनी वर्णिलेल्या कन्हैय्याच्या बालक्रीडांची आपण आठवण करून पाहावी. 'पाण्याचे पंख' मध्येही लोण्याने माखलेला तोच खोडकर चिमणचेहरा पानापानांत प्रकट झालेला दिसेल. यावरून श्रीनिवासांच्या या लेखनाची ताकद व त्याचा पिंडधर्म सहज लक्षात येईल.

निरागस नि निश्छल, सजग व संवेदनशील बाल-मनाचे उत्कट चित्रण प्रस्तुत संग्रहाचा लक्षणीय विशेष आहे. बालांची कल्पनासृष्टी, भावजगत आणि तीव्र वेदनादींची अभिव्यक्ती गूढ व मोठी मजेदार असते. या गोष्टीचा प्रत्यय या संग्रहात सर्वत्र येतो. सगळ्याच लेखांमध्ये लेखकाची सारी जवळची व जिव्हाळ्याची मुले-माणसे वावरताहेत. त्यांच्या व्यक्तिचित्रणात भाव-कोमल, लडिवाळ शब्दांचा झंकार असूनही लेखकाने कलावंताची अलिप्तता कुठेही शिथिल होऊ दिली नाही. ही अवघड गोष्ट तशी सहजसाध्य नव्हे.

'आलोक' व 'घंटीवाला' ही बालरूपे केवळ अविस्मरणीय. एक पहिले तर दुसरे सर्वांत शेवटी, ही


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रचनाही दाद द्यावी अशीच. या दोहोंतील सुखदु:खाची आंदोलने मनाचा तुकडाच काढतात. तो भाक्या. जगावेगळा. अपूर्वाईचा. अवघा जीवनरस शोषणारा त्याचा गूढ आजार नि शेवटी अटळ अपमृत्यू. वेदनेच्या मूलकंदाला गहिवर फोडणारा मोठा विलक्षण अनुभव. 'आलोक'मध्ये कितीतरी गूढ अतर्क्य घटिते समोर येतात. श्रद्धेच्या सावलीत संयमाने जीवनाची वाटचाल करणे हेच काय ते आपल्या हाती आहे, हे आकळते. नियतीचे अदृश्य हात आपल्या अवतीभोवती किती गूढपणे व्यापून असतात, हेही उमगते. 'घंटीवाल्या'ची काळीज कुरतडणारी कळ आपणालाही इंद्रियांच्या पैलतीरावर घेऊन जाते. 'पाहुणा'मध्ये एका अनामिक लहानग्याच्या आईचा अकाली मृत्यू जेव्हा लेखकाच्या कानावर येतो, तेव्हाचे त्याचे ते उद्गार : " ... अरे, तुमचा मला काहीसुद्धा त्रास झाला नव्हता... " ( पृष्ठ ९४ )– अक्षरश: भोवळून टाकतात. त्या लहानग्याचे कुणाच्या तरी परिचयाने लेखकाच्या घरी आगमन झालेले असते. त्याची आई दवाखान्यात असते. २।४ दिवसांत ती देवाकडे जाते... या पार्श्वभूमीवरचे उपरोक्त उद्गार निर्मम पोरकेपणावर उबदार पांघरूण घालणाऱ्या मायेच्या कढातून अवतरले आहेत...इतकेच नव्हे तर लहानग्याच्या आगमनाने आधी लेखकाच्या मनावर उठलेल्या नाखुशीच्या ओरखड्यावरील तो एका सात्त्विक पश्चात्तापाचाही भाग आहे.

'आलोक', 'मिकी', 'रावा', 'मनू' 'पदम' नि इतर; हा हसरा बालवृंद व त्याचे चैतन्यमय तजेलदार चित्रण विशेष अपूर्वाईचे आहे. बालांची गाणी, नादसुरांचे त्यांचे वेड, मुक्त वागणे, शब्दसंख्यादींचे त्यांना सहजगत्या होणारे स्फुरण–सृजन, भाषिक विकासाच्या वाटावळणांवर रडत, पडत-उठत चालणारे मनमोहक बोबडे बोल, त्यांच्या समजशक्तीचा चढत जाणारा आलेख, रक्त-नात्याच्या चिवटपणात गुंतून राहिलेले आई-वडिलांचे आभाळभरलेपण, मुलांच्या मनात सतत दडलेली प्राण्यांविषयीची सहज प्रीती किंवा भीती इ. च्या वर्णन-चित्रणामध्ये श्रीनिवासांच्या समर्थ शैलीचे विविध विभ्रम दृष्टीला पडतात. पंचेंद्रियांच्या या रंगासक्त पंखांवरून अनुभवाचे भुरभुरते परागकण गोळा करतानाचे बालांचे नैसर्गिक अधाशीपण लोकमानसात मुरलेल्या अनेक जिवट श्रद्धा इ., मातृसुखाला वंचित राहिलेल्या कुण्या स्त्रीची विकृत, विखारी नजर ह्या साऱ्यांचे एक भावोत्कट चित्र 'पाण्याचे पंख' मध्ये उमटले आहे.

श्रीनिवासांची भाषा हा खरे तर एका स्वतंत्र चर्चेचा विषय ठरावा. ती प्रौढ, पारदर्शक, परिमार्जित नि आशयघन तर आहेच. शिवाय एकेक वाक्य, त्याची आंतरिक लय, शब्दविन्यास हे सगळे एवढ्या ठाकठिकीचे, की आशयाचा आरसा एकदम लख्ख ! वास्तविक आत्मकथनाला जवळ असलेल्या ललित गद्यलेखनात बाहुलीसारखी बडबडी, वाचाळ भाषा फतकल मारून बसण्याचा मोठा धोका असतो. श्रीनिवासांची भाषा मात्र तटस्थ व बंदिस्त वाटते. शास्त्रीय संगीतातील सुरावटीसारखी अगदी ठिकच्या ठिकाणी. सैल, पसरट असे काही नाही. शब्दांची फुका उधळमाधळ नाही. एका बाजूने त्यांची भाषा जेवढी मुग्ध वाटते, ती दुसऱ्या अंगाने तेवढीच मुखरही वाटते ही नवलाईची शैली अपूर्व म्हणावी लागेल. समासशैलीचा कितीतरी सरस, सहजसुंदर असा हा आविष्कार आहे. 'बुंडकले', 'काकळ', 'नादी', 'अवतारिक', 'दांड' अशा कित्येक देशी वाणाच्या शब्दांचा चपखल आणि विलक्षण ताकदीचा उपयोग श्रीनिवासांनी केला आहे. एरवी, हे शब्द अगदीच सपक, खडबडीत वाटतात. काव्यातील शब्दांचे स्थान जसे नेमके अढळ व अटळ असते–असावे, तीच गोष्ट श्रीनिवासांच्या गद्यातील शब्दांची.

सुश्री वासंती मुझुमदार यांनी या संग्रहातील सखोल, समृद्ध आशयघनतेचे प्राणतत्त्व साकार करणारी रंगरेषांची जी जिवंत रचना मुखपृष्ठावर रेखली आहे, ती प्रसन्न आणि देखणी आहे. विशेष म्हणजे पंचमहाभूतांच्या प्रतीकात्मक झोतात झळाळणारी बालप्रतिमा मनाला सायीसारखा मजेदार स्पर्श करून जाते. शेवटी, एकच वाटते की, एवढ्या गोंडस बालरूपाच्या गोजिऱ्या गालांवर मुद्रणदोषाचे तीट का बरे असावे ? पुन्हा तेही 'मौजे'कडून.

– वसंत केशव पाटील








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# वाद–संवाद

संपादक नवभारत' यांस, स. न.

जाने. १९८९ च्या अंकातील 'वाद–संवाद' या सदरात श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांनी रामचरित्रावर घेतल्या जाणाऱ्या आक्षेपांना उत्तरे दिली आहेत. पण ती पटण्यासारखी नाहीत.

१) "राम हा देव नसून देवाचा अवतार होता. त्यामुळे मानवी व्यवहाराच्या साऱ्या मर्यादा त्याला पडतात."

–मग असा मर्यादित सामर्थ्य असणारा अवतार परमेश्वर घेतोच कशाला? परमेश्वर न्यायी, दयाळू वगैरे सर्वकाही आहे, त्याचा अवतार मात्र अन्यायी, कपटी, खोटेपणा करणारा, जुन्या अन्यायी परंपरा मोडण्याची हिंमत नसणारा, लोकप्रक्षोभाला घाबरणारा वगैरे असू शकतो. याचा अर्थ आपण परमेश्वराचे अवमल्यन तरी करतो किंवा माणसासारख्या माणसानेच विशेष कर्तबगारी दर्शवताच त्याला अवतार मानू लागतो. रामाला अवतार मानण्यापायी या दोन्ही गोष्टी घडल्या आहेत.

२) "शत्रुस्थानी असणाऱ्या राज्यकर्त्यांची हत्या करून त्या जागी आपल्या मित्राची स्थापना करणे हा गुन्हा होत नाही."

–आक्षेप आहे तो शत्रूला ठार करण्यात नसून त्याला कपटाने ठार करण्याबद्दल. 'मी सुग्रीवाचा मित्र, आहे. हो माझ्याशी युद्धाला तयार' असे आव्हान रामाने देऊन वालीला ठार केले असते तर ते निदान युद्धनीतीला अनुसरून झाले असते. लपून हल्ला केल्याशिवाय सुग्रीवापुढे आपला निभाव लागणार नाही, हे रामाने ओळखले असावे. त्यामुळे डावपेच म्हणून त्याचे वर्तन योग्य म्हणावे लागेल. पण 'तुझी वर्तणूक अधर्म्य असल्यामुळे मी तुला शासन करीत आहे' वगैरे रामाचे भाषण म्हणजे आपल्या लबाडीचे उदात्तीकरण करण्याचा प्रयत्न आहे. राम काही तिथला शासनकर्ता नव्हता. दुसऱ्याच्या राज्यात शिरून तिथल्या राजाला परस्पर शासन करण्याचा रामाला अधिकारच काय?

३) "लोकांच्या इच्छेवरून मी तुझा त्याग करीत आहे." असे रामाने सीतेला स्वतः सांगितले नाही याला कपट म्हणता येईल काय?

–स्वतः सांगो वा निरोपाने सांगो, सीतेचा त्याग करणे हाच फार मोठा अन्याय होता, हे कोणालाही पटेल. लोकांच्या इच्छेसाठी मी सीतेचा त्याग करतो हे रामाचे स्पष्टीकरण खरे मानायचे तर वनवासास जातेवेळी हेच तमाम अयोध्यावासी लोक धाय मोकलून, पाया पडून रामाने वनवासात जाऊ नये असे विनवीत होते. त्या वेळी या लोकेच्छेला मान देण्याचे रामाने का नाकारले? कुचाळक्या करणाऱ्या काही नगण्य लोकांचे मत सीता अपवित्र आहे असे असेल. ते ग्राह्य मानणाऱ्या रामाने शतप्रतिशत जनता प्रेमाने आणि आदराने करत असलेली मागणी ग्राह्य मानली नाही. आणि तरीही रामाने पतिधर्मापेक्षा राजधर्म श्रेष्ठ मानला, सामाजिक तत्त्वासाठी व्यक्तिगत प्रेमाचा त्याग केला, असे खुलासे लोक करू धजतात याचे आश्चर्य वाटते.

खरा राजधर्म लक्ष्मणाला कळत होता. तो रामाला म्हणाला, "या म्हातारचळ लागलेल्या स्त्रीलंपट बापाचे वाटेल ते म्हणणे तू ऐकणार काय? युद्ध पुकार त्याच्याशी, मी सैन्य घेऊन तुझ्या मदतीला येतो!" पण रामाला बहुधा आपल्या पितृआज्ञाधारकत्वाचा कैफ चढला होता. आपण वनवासात गेल्यावर दुःखावेगाने दशरथ मरण पावेल याची त्याला कल्पना असलीच पाहिजे. म्हणजे एकवेळ पिता मेला तरी चालेल, पण त्याची आज्ञा पाळणार असा हा वेडा हट्ट म्हटला पाहिजे.

–शंबूकवधाबद्दल नी. र. वऱ्हाडपांडे काहीच खुलासा करत नाहीत; कारण कितीही ओढूनताणून करायचा म्हटला तरी खुलासा करायला या हकीगतीत वावच नाही. 'त्या वेळच्या कायद्यानुसार राम वागला' असा भोळसट खुलासा काही जण करतात. पण अन्यायी कायद्यानुसार वागणारा देवाचा अवतार का मानायचा? रावणही त्याच्या राक्षसी कायद्यानुसारच वागत होता; त्याला शासन का? या प्रश्नाला रामभक्तांच्या जवळ उत्तर नसते.

रामाला मर्यादापुरुषोत्तम मानले जाते हे त्याचे गुणवर्णन म्हणायचे की दोषवर्णन? आम्ही लक्षावधी लोक सकाळपासून रात्रीपर्यंत कायद्याच्या, नीतीच्या, रूढींच्या समाजाच्या, कुटुंबाच्या, मर्यादा संभाळत संभाळत कसेबसे जगत असतो. एखादा पराक्रमी पुरुष निपजतो आणि यातील समाजाच्या प्रगतिआड येणाऱ्या मर्यादा झुगारून देऊन बंड पुकारतो. ज्ञानेश्वरांनी अशा मर्यादा ओलांडल्या, शिवाजी महाराजांनी जुमानल्या नाहीत, बाजीराव पेशवा, सुभाषचंद्र बोस, महात्माजी, आण्णासाहेब कर्वे, आगरकर यांनी मर्यादापुरुषोत्तम व्हायचे ठरवले





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असते तर आपण अजून मध्ययुगातच राहिलो असतो. रामाने तत्कालीन रूढी आणि धर्माच्या मर्यादा ओलांडायचे ठरवले असते तर भारताचा इतिहास बदलला असता. अशा रामाने 'तुझ्या राज्यात एक शूद्र तपश्चर्या करतो आहे म्हणून हे बालक मेले' असे तर्कशून्य, अशास्त्रीय आणि तद्दन खोटे विधान करणाऱ्या ऋषीला प्रथम वनवासाला पाठवला असता. शंबूकाला राजधानीत बोलावून त्याचा सत्कार करून, 'सर्व शूद्र, अतिशूद्र, आदिवासी, वा-नर मंडळींनी खुशाल वेदाध्ययन आणि विद्यार्जन करावे, त्यांना विरोध करणाऱ्या द्विजमंडळींचा समाचार घ्यायला मी समर्थ आहे.' असे जाहीर केले असते, आणि भारत आज अमेरिकेला कर्ज देण्याइतका संपन्न झाला असता. नव्हे, भारतीयांनीच अमेरिका खंडात आपले राज्य स्थापले असते.

खरा राजधर्म रामाने पाळला असता तर सीतावियोगाची वेळच आली नसती. आणि काही कारणाने आली असती, तरी "सीता शुद्ध आहे याची मला खात्री आहे, याउप्पर कोणी तिच्या चारित्र्याविषयी ब्र उच्चारला तर अशा माणसाला भर चौकात उभे करून रामबाण घालण्यात येतील" असे रामाने ठणकावून सांगितले असते, तर एखाद्या व्यक्तीच्या कर्तृत्वाकडे न पाहता तिच्या लैंगिक चारित्र्यविषयक खऱ्याखोट्या गप्पा चघळत बसण्याची भारतीयांची पुरातन सवय जरा कमी झाली असती. एवढेच नव्हे तर 'चारित्र्याच्या संशयावरून पत्नीचा खून' अशी दर आठ दिवसांतून दोनतीन वेळा येणारी बातमी वाचायला मिळाली नसती; कारण पराक्रमी रामाचे उदाहरण डोळ्यापुढे ठेवून भारतीयांनी योनिशुचितेला अवास्तव महत्त्व दिले नसते.

एका महाकाव्याचा नायक या नात्याने रामाचे चरित्र, त्यातले विविध प्रसंग, रामावर कोसळलेली संकटे, त्यांचा त्याने केलेला सामना, अनेक वेळी त्याच्या मनाची होणारी तगमग, अनेक अप्रिय निर्णय घ्यावे लागणे, प्रिय व्यक्तींचा त्याग करावा लागणे हे सर्व अतिशय हृद्य आणि मनाला चटका लावणारे आहे. काव्य म्हणून त्याचा आस्वाद घेणे रसिक मनाला पुनःपुन्हा आनंद देणारे आहे. पण त्याला देवतास्वरूप मानणे आणि त्याला कराव्या लागलेल्या सर्व गोष्टींचे नैतिक समर्थन करत राहणे योग्य नव्हे. इंग्लंडमधल्या नागरिकांनी हॅम्लेटची देवळे बांधून त्याचा जन्मोत्सव, नवस इ. करायला सुरवात केली तर कसे वाटेल ? तसेच हे आहे.

— शरद अभ्यंकर

○ ○ ○


। सत्फलाय सहकारिता ।

वाईकरांच्या जिव्हाळ्याची

## दि वाई अर्बन को-ऑप. बँक लि.

वाई ( सातारा ) फोन नं. ७

★ मुदत ठेवींवर आकर्षक व्याज ★ बचतीच्या विविध योजना

★ सुलभ हप्त्यांची हायरपरचेस योजना ★ सेफ डिपॉझिट लॉकर्सची सोय ★ तत्पर सेवा

शाखा : पांचगणी (फोन नं. २२०), लोणंद व शिरवळ.

द. न. पटवर्धन
चेअरमन





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# सार-संकलन

## सैतानी कोण ?

आयातुल्ला खोमिनी यांनी १४ फेब्रुवारी रोजी काढलेल्या फतव्यात पुढील घोषणा करण्यात आली आहे—

"जगातील अभिमानी मुस्लिम जनतेला मी ही खबर देतो की 'सैतानी श्लोक' ( सेटॅनिक व्हर्सिस ) ह्या इस्लाम, प्रेषित आणि कुराण यांच्या विरुद्ध असलेल्या पुस्तकाच्या लेखकाला, आणि ज्या कुणाचा, ह्या पुस्तकाचा आशय माहीत असतानाही त्याच्या प्रकाशनात हात आहे त्या सर्वांना देहान्ताची शिक्षा देण्यात आली आहे. हे जेथे सापडतील तेथे त्यांना ठार करावे असे माझे सर्व मुसलमानांना सांगणे आहे." ह्या पुस्तकाचे लेखक सलमान रश्दी ह्यांचा 'अपवित्र रक्ताचा माणूस' ह्या शब्दांत खोमिनी यांनी धिक्कार केला आहे.

सर्व इस्लामी जगात ह्या पुस्तकावर बंदी घालण्यात आली आहे. भारत सरकारने बहुधा सर्वप्रथम बंदी घातली. इंग्लंडमध्ये ब्रॅड्फर्ड येथे, इस्लामाबादमध्ये, श्रीनगर व मुंबई ह्या शहरांत मुस्लिम जमावाने कडवी, आणि काही ठिकाणी हिंसक, निदर्शने केली. तेहरान येथील ब्रिटिश वकिलातीवर दगडफेक करण्यात आली. सलमान रश्दी यांना ठार मारण्यासाठी दशलक्ष डॉलर्सचे पारितोषिक जाहीर करण्यात आले आहे.

मुसलमानांच्या धार्मिक भावना आपल्या हातून दुखावल्या गेल्याबद्दल रश्दी यांनी खेद प्रदर्शित केला; पण ती पुरेशी क्षमायाचना आहे असे मानण्यात आले नाही. त्यांचे प्रकाशक व्हायकिंग-पेन्ग्विन यांनीही क्षमायाचना केली. प्रमुख विक्रेते डब्ल्यू. एच्. स्मिथ यांनी लोकांचा रोष ओढवेल अशा ठिकाणी पुस्तकाच्या प्रती दर्शनी ठेवण्यात येणार नाहीत असे जाहीर केले. आणि त्यांचे फ्रेंच प्रकाशक ख्रिस्तियन बुर्ज्वा यांनी पुस्तकाच्या फ्रेंच भाषांतराचे प्रकाशन स्थगित करण्याचे आपण ठरविले आहे असे प्रसिद्ध करून आपली सुटका करून घेतली.

खोमिनी हे एका राष्ट्राचे प्रमुख आहेत. आणि दुसऱ्या एका राष्ट्राच्या नागरिकाचा खून करायला आपल्या अनुयायांना ते चिथावणी देत आहेत. तेव्हा खोमिनी यांनी घडवून आणलेल्या ह्या परिस्थितीला आंतरराष्ट्रीय अंग आहे.

रश्दी यांचे जीवित खरोखरीच धोक्यात आहे, ह्याविषयी कुणाच्याही मनात शंका नाही.

खोमिनी यांची घोषणा होण्यापूर्वी इराण आणि पश्चिमी राष्ट्रे ह्यांच्यात सुरळीत संबंध परत प्रस्थापित करण्याच्या प्रक्रियेला सुरवात झाली होती. ह्या उपक्रमाला खोमिनी यांचा पाठिंबा आहे अशी सर्वसाधारण समजूत होती. इराकबरोबर केलेल्या युद्धात इराणला जबर किंमत सोसावी लागली आणि अखेरीस फजिती पत्करावी लागली. ह्या अनुभवामुळे इराणच्या इस्लामी क्रांतीतील उन्माद निचरून जाईल आणि ते अधिक सौम्य, समंजस असे अंतर्गत आणि परराष्ट्रीय धोरण स्वीकारील अशी आशा वाटण्याजोगी चिन्हे दिसू लागली होती. अर्थात इराणमध्ये एक धर्मपिसाट पक्ष आहे आणि तो ह्या परिवर्तनाला विरोध करील ही कल्पना सर्वांना होती. खोमिनी वृद्ध आणि क्षीण होत आहेत आणि ह्याचा फायदा घेऊन कडव्या धर्मांध पक्षाने हा विलक्षण फतवा काढण्याचा सल्ला त्यांच्या गळी उतरविला; पण डोके शांत झाल्यावर खोमिनी काहीतरी क्लृप्ती करून पावले मागे घेतील अशी अनेक मुत्सद्द्यांची समजूत होती. ती खोटी ठरली आहे. इराणने अधिक व्यवहारी धोरण स्वीकारावे हा सल्ला खोमिनी यांनी मानला असला, तरी त्यांची निष्ठा सर्वप्रथम इस्लामच्या प्रेषिताशी आहे हे सर्वांना दिसून आले आहे.

ह्या वावटळीत मार्गारेट थॅचर यांच्या नेतृत्वाखाली ब्रिटन खंबीर राहिले. "सैतानी श्लोक" ह्या पुस्तकात त्यांचा उल्लेख 'मॅगी टॉर्चर' असा झाला असला तरी त्यांनी आपल्या परराष्ट्रमंत्र्याला युरोपिअन इकॉनॉमिक कम्युनिटीमधील—युरोपीय सामाजिक आर्थिक समाज—देशांना इराणविरुद्ध भूमिका घेण्याला प्रवृत्त करण्यासाठी पाठविले. ह्या कामगिरीत ते यशस्वी झाले. ह्या सर्व देशांनी, तसेच स्वीडन आणि कॅनडा यांनी ब्रिटनला पाठिंबा दिला आणि इराणमधील आपापले वकील परत बोलावले. ब्रिटनने इराणमधील

अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपली वकिलात पूर्णपणे गुंडाळली. ह्याची किंमत अर्थात ब्रिटनला द्यावी लागेल. इराणबरोबर आपला व्यापार वाढविण्याचे ब्रिटनचे प्रयत्न होते. त्यातून जो नफा झाला असता त्याला आता इंग्लंडला मुकावे लागेल. पण शिवाय इराणमध्ये आणि इराणशी सहानुभूती असलेल्या गटाने लेबनॉनमध्ये जी एकंदर तीन ब्रिटिश माणसे ओलिस म्हणून धरली आहेत त्यांच्या सुटकेचे प्रयत्नही आता सोडून द्यावे लागतील. माणसांचे स्वातंत्र्य आणि विचारस्वातंत्र्य यांत निवड करावी लागण्याचा विचित्र प्रसंग ब्रिटनपुढे आला आहे.

आपण दहशतवाद्यांशी व्यवहार करीत नाही असे मार्गारेट थॅचर एकदा म्हणाल्या होत्या. पाळी आली तेव्हा या तत्त्वावर त्या खंबीर राहिल्या असे म्हणावे लागेल. शीख दहशतवाद्यांच्या संबंधातही हे तत्त्व त्या पाळतील अशी आशा करता येईल. ब्रिटनमध्ये १५ लाख मुसलमान आहेत. त्यांतील नव्वद टक्के सुन्नी आहेत. आपल्या भावना आणि मूल्ये समजून घेण्याला ब्रिटिश लोक असमर्थ आहेत हे दिसून आले आहे, असे बहुसंख्य ब्रिटिश मुसलमानांचे गाऱ्हाणे आहे. रश्दी यांचे पुस्तक ऑक्टोबरमध्ये प्रसिद्ध झाले. तेव्हापासून ते फेब्रुवारीच्या मध्यापर्यंत त्यांनी पुस्तकाविरुद्ध जे निषेध-प्रदर्शन केले, त्याची ब्रिटिश वृत्तपत्रांनी योग्य ती दखल घेतली नाही असे त्यांचे म्हणणे आहे. 'सैतानी श्लोकां'-तील कोणते लिखाण मुसलमानांना आक्षेपार्ह वाटते आणि ते का वाटते, ह्या विषयावर ह्या अवधीत ब्रिटिश वृत्तपत्रांमध्ये एक लेख प्रसिद्ध करण्यात आला नाही. पण समारंभपूर्वक 'सैतानी श्लोक' जाळण्याच्या प्रसंगांना प्रसिद्धी देण्यात आली. ह्यामुळे मुसलमान रासवट आहेत असा लोकांचा ग्रह होणे शक्य आहे.

'इस्लामी बाबींविषयीची कृतिसमिती–ॲक्शन कमिटी फॉर इस्लामी अफेअर्स– ह्या संघटनेने ह्या निषेधप्रदर्शनात पुढाकार घेतला होता. ह्या संघटनेला सौदी अरेबियाचा पाठिंबा आहे आणि सुन्नी इस्लामचा प्रचार करणे हे तिचे उद्दिष्ट आहे. लंडनमधील सर्व राष्ट्रांच्या वकिलातींकडे 'सैतानी श्लोकां'तील आक्षेपार्ह लिखाणाकडे लक्ष वेधणारे प्रचारसाहित्य ह्याच संघटनेने पाठविले. त्याचा फायदा आयातुल्ला खोमिनींच्या शियापंथाला झाला ही उपरोधिक घटना आहे.

रागावलेल्या काही ब्रिटिश मुसलमानांनी रश्दी यांना ठार मारण्याच्या आयातुल्ला खोमिनी ह्यांनी केलेल्या आवाहनाला प्रथम पाठिंबा दिला. त्यात सुन्नी होते आणि शियाही होते. पण ब्रिटनमधील मुल्लांनी प्रथम कोणतीही भूमिका घेतली असली तरी नंतर, आपल्या मवाळ राजकीय नेतृत्वाचा सल्ला मानून, ब्रिटनमधील मुसलमानांनी ब्रिटिश कायदा पाळावा असेच त्यांनी आवाहन केले.

रश्दी प्रकरणामुळे ब्रिटनमधील वांशिक संबंध अधिकच बिघडतील अशी भीती आहे. ब्रिटनमध्ये वसती करून राहिलेल्या मुसलमानांच्या पुढाऱ्यांना आपल्या जमातीला हळूहळू सामाजिक मान्यता लाभत आहे असा विश्वास वाटू लागला होता. उदा., अलीकडे 'डेली मेल' ह्या बहुखपाच्या ब्रिटिश पत्रात मुसलमान जमातीचे गुण वर्णन करणारी लेखमाला प्रसिद्ध करण्यात आली होती. "... ही एक नवीन परंपरावादी जमात ब्रिटनमध्ये आली आहे. श्रद्धाळू, कष्टाळू, शिस्त अंगी बाणलेले असे हे लोक आहेत. ज्या गुणांमुळे ब्रिटन एक थोर राष्ट्र बनले आहे, ते सर्व त्यांच्यात आहेत." असा ह्या लेखमालेचा निष्कर्ष होता. पूर्व लंडनमध्ये ८० सालापासून वांशिक हल्ले वाढू लागले. पण ब्रॅडफर्ड एकंदरीत त्यांच्यापासून मुक्त होते.

पण आता बहुधा परिस्थिती वेगळे वळण घेईल. भिन्न संस्कृतींच्या मुलांना त्यांच्या त्यांच्या संस्कृतीच्या अनुरोधाने भिन्न अभ्यासक्रम असावेत असे शैक्षणिक धोरण ब्रिटनमध्ये रुजविण्याचे प्रयत्न होत आहेत. त्यांना विरोध करणारी संपादकीये प्रसिद्ध होऊ लागली आहेत. इस्लामी संस्कृतीची काही अंगे ब्रिटनच्या दृष्टीने अमान्य होण्याइतकी परकी ठरतील, असा ह्या संपादकीयांचा सूर आहे. पण मुख्य गोष्ट ही आहे की, रश्दी-विरुद्ध हिंसाचार करण्याचे आवाहन मुसलमानी नेत्यांनी केले आहे. हिंसाचार दोन्ही बाजूंनी होऊ शकतो हे २२ फेब्रुवारी रोजी लंडनच्या रीजन्ट पार्कमधील प्रमुख मशिदीवर अग्निबॉंब फेकण्यात आला यावरून ब्रिटिश मुसलमानांना कळून आले असणार.

त्यांच्या स्वतःच्याच स्वास्थ्याच्या दृष्टीने हे त्यांना कळणे आवश्यक आहे.

ब्रॅडफर्डमध्ये ३७ मशिदी आहेत. त्यांतील एका मशिदीत मुस्लिम मुलांचे दोन गट कुराण शिकतात. शाळेतून परतल्यावर संध्याकाळी इस्लामचे ज्ञान करून घेण्यासाठी ते येथे येतात. दोन इमाम त्यांना शिकविण्याचे काम करतात. मुली एका वेगळ्या खोलीत






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बसतात. मुलींची वये ५ ते १३ अशी आहेत. इमाम मसूद अहमद काद्री त्यांना एकाएकी उर्दूतून विचारतात, "मुलींनो, तुम्ही 'सलमान रश्दी' हे नाव ऐकले आहे?" त्या सर्वजण एका आवाजात "होय" म्हणतात. "मग त्यांच्या बाबतीत काय करावे असे तुम्हाला वाटते?" इमाम विचारतात. सफीना खान वय १३, इंग्रजीत सांगते, "त्याचे हात छाटून टाकावे." अझरा बिबी, वय १२, म्हणते, "त्याला फाशी दिले पाहिजे. कारण त्यांनी कुराणाविषयी गैर गोष्टी लिहिल्या आहेत."

## अफगाणिस्तानातील परिस्थिती

अफगाणिस्तानात ठाण मांडून बसलेल्या रशियन सैन्याचे प्रमुख ले. ज. बोरिस ग्रोमॉव्ह यांनी असे जाहीर केले होते की, अफगाणिस्तानातून रशियाला परतणारा शेवटचा सैनिक म्हणजे आपण स्वतः असू. आणि तसे घडलेही. फेब्रुवारी १५ रोजी ज. ग्रोमॉव्ह यांनी जेव्हा ऑक्सस नदी ओलांडली, तेव्हा रशियन सैन्याने अफगाणिस्तानचा घेतलेला ताबा संपला.

गेली ९ वर्षे चाललेल्या अफगाणी भ्रातृयुद्धात १० लक्ष अफगाण ठार झाले आणि इतर ९० लक्ष अफगाणांनी देशत्याग केला आहे किंवा स्थलांतर केले आहे. रशियन फौजा अफगाणिस्तानात येण्यापूर्वी अफगाणी यादवी युद्धाची जी स्थिती होती, ती आता फिरून प्रस्थापित झाली आहे. काबूलमध्ये कम्युनिस्ट सरकार आहे आणि शहरावर त्याचे नियंत्रण आहे. ग्रामीण भागावर बऱ्याच प्रमाणात पाखंडी कम्युनिस्ट राजवटीविरुद्ध धर्मयुद्ध लढणाऱ्या मुजाहीद गनिमांचे नियंत्रण आहे.

एक आशा अशी होती की, रशियन फौजा निघून गेल्यानंतर मुजाहिदांतील सर्व पक्षांचे मिळून एक संयुक्त सरकार देशाबाहेर स्थापन करता येईल आणि कालांतराने ते खरेखुरे सरकार बनेल. ही आशा १० फेब्रुवारीला मावळली. अशा सरकारची निवड करण्यासाठी अफगाणिस्तान, इराण, पाश्चात्त्य देश आणि पाकिस्तान इ. देशांतून शेकडो प्रतिनिधी ह्या दिवशी रावळपिंडी येथे जमले होते. ही परिषद ३ दिवस चालणार होती. ती ४० मिनिटांत कोसळली.

शुरा, म्हणजे प्रतिनिधि-मंडळात इराणमध्ये असलेल्या शिया मुजाहिदांना किती जागा असाव्यात, हा वादाचा मुद्दा होता. असे दिसले तरी खरी गोष्ट अशी आहे की, पाकिस्तानात असलेल्या मुजाहिदांतील दोन परस्परविरोधी गटांमधील वितुष्ट विकोपाला गेल्यामुळे ही बैठक फिसकटली. पाकिस्तानचा पाठिंबा ज्या कडव्या जहाल गटाला आहे, त्याला अफगाणिस्तानमध्ये पक्की इस्लामी राजवट स्थापन करायची आहे. उलट, अफगाणी परंपरा जशी होती त्या स्वरूपात तिची पुनः-स्थापना करू पाहणारा गट ह्या जहाल गटाच्या विरुद्ध आहे. शियाप्रतिनिधींशी हातमिळवणी करून आपण शुरामध्ये बहुमत मिळवू अशी परंपरावादी गटाला आशा होती. पण पाकिस्तानने जहाल गटाला प्रमाणाबाहेर प्रतिनिधित्व दिल्यामुळे हा डाव फसला. तेव्हा काही परंपरावादी आणि शिया प्रतिनिधी बैठकीतून बाहेर पडले.

उरलेल्या प्रतिनिधींनी जे सरकार निवडले ते खऱ्या अर्थाने प्रातिनिधिक नाही हे स्पष्ट आहे. अफगाणिस्तानात असलेल्या ज्या नागरी किंवा लष्करी अधिकाऱ्यांना यादवी थांबवावी असे वाटत असेल, त्यांच्यापुढे आता ते ज्याला शरण जाऊ शकतील असे प्रातिनिधिक सरकार नाही. गनिमी युद्ध चालविणारे जे सेनाधिकारी आहेत तेही राजकीय पुढाऱ्यांचा नाद सोडून देतील अशी चिन्हे आहेत. अब्दुल हक हे काबूल क्षेत्रातील गनिमी सेनाधिकारी आहेत. "ह्या राजकीय पुढाऱ्यांना केवळ पैसा आणि प्रसिद्धी पाहिजे, आणखी काही नको." असे कडवट उद्‌गार त्यांनी ह्या बैठकीनंतर काढले.

पण गनिमी सैनिकांमध्येही एकी नाही. गनिमांनी अनेक वर्षे चालविलेल्या प्रतिकारयुद्धात बहाद्दर म्हणून सर्वांत प्रसिद्ध असलेला सेनाधिकारी म्हणजे अहमदशहा मसूद. त्यांच्या सहकार्याने काबूल जिंकून घेण्याची एक योजना हक ह्यांनी बनविली आहे. पण मसूद आणि हक यांचे पटत नाही. मसूद हे तजिक जमातीचे आहेत तर हक हे पठाण आहेत. अफगाणी लोकांच्या मानाने दोघेही व्यवहारी आणि समंजस आहेत. तरीही एकत्र येऊन काम करणे दोघांना जमत नाही.

जर काबूल पडले तर ह्या समस्या अधिक तीव्र बनतील. अफगाणिस्तानात वांशिक आणि धार्मिक जमातींचा जो प्रादेशिक नकाशा होता, तो युद्धामुळे पुसट झाला आहे. अफगाण राज्य पठाणांनी स्थापन केले आणि युद्धापूर्वी ४० टक्के लोकसंख्या पठाणांची होती. पण पठाणांची वसती पाकिस्ताननजीक आहे.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि म्हणून त्यांनी मोठ्या प्रमाणावर पाकिस्तानात स्थलांतर केले. पठाणांच्या खालोखाल फारशी भाषा बोलणाऱ्या तद्झिकांची वसती आहे. ती उत्तरेच्या भागात आहे. तद्झिक देशातच राहिले आणि प्रतिकार-युद्धात त्यांचा मोठा हिस्सा होता. त्याचे पारितोषिक आता त्यांना हवे असणार.

पठाण आणि तद्झिक दोघे सुन्नी मुसलमान आहेत. पण १५ टक्के अफगाण शिया आहेत. पठाण राजवटीत आपल्यावर जुलूमजबरदस्ती होत असे, असे त्यांचे गाऱ्हाणे आहे. यापुढे आपल्याला आदरपूर्वक वागविण्यात आले नाही तर आपण कम्युनिस्ट राजवटीशी समझौता करू अशी त्यांनी धमकी दिली आहे. इराणच्या शिया राजवटीचा त्यांना पाठिंबा आहे. इराकबरोबर शस्त्र-संधी झाल्यानंतर इराण अफगाणिस्तानातील घडामोडींत अधिक लक्ष घालीत आहे. ऑलिव्हर नॉर्थ यांनी इराणला शस्त्रपुरवठा करण्याचा जो उद्योग केला, त्या संदर्भात उघडकीला आलेल्या गोष्टींतील एक अशी की, अफगाणिस्तानात कम्युनिस्टांविरुद्ध लढायला आपले सैनिक पाठवायला आपण तयार आहोत असे इराणने अमेरिकेला सांगितले. अफगाणिस्तानच्या संबंधात इराणच्या महत्त्वाकांक्षा काय आहेत, ह्याची ह्यावरून प्रचीती येते.

थोडक्यात गोष्ट अशी की, रशियन धटिंगणांची देशाबाहेर रवानगी केल्यानंतर आता अफगाणिस्तानला आपल्या पूर्वेच्या आणि पश्चिमेच्या शेजाऱ्यांशी मुकाबला केला पाहिजे. ह्यामुळे आणि सर्वमान्य सरकाराची निवड करण्यात गनिमांना आलेल्या अपयशामुळे यादवी युद्धाची परिस्थिती चालू राहणार अशी चिन्हे दिसत आहेत. अफगाण लोकांचा तरी अंदाज असा आहे. जे लक्षावधी अफगाण देश सोडून परागंदा झाले आहेत, त्यांच्यांत गेल्या सहा आठवड्यांत वीस हजारांची भर पडली आहे.

## परकीयांची भीती

एखादा तुर्क प. जर्मनीच्या सरकारचा प्रमुख होईल का ? जर्मनांना शेजारच्या देशात, उदा., स्वित्झर्लंड-मध्ये शरणार्थी म्हणून आश्रय घ्यावा लागेल का ? आज अशी भीती खरोखर कुणाला वाटली तर 'हास्यास्पद' म्हणून आपण तिची संभावना करू. पण जर्मनेतर लोक मोठ्या संख्येने देशात घुसत आहेत आणि त्यामुळे लोकसंख्येचा तोंडवळाच बदलेल अशी भीती बऱ्याच जर्मनांना वाटू लागली आहे.

गेल्या महायुद्धानंतर प. जर्मन अर्थव्यवस्थेचे जे आश्चर्यकारक पुनरुत्थान झाले, त्या वेळी जर्मनीला कामगारांची अतिशय जरुरी होती आणि परदेशातून येणाऱ्या पाहुण्या कामगारांचे, विशेषतः तुर्कांचे, जर्मनीत स्वागत होई. पाहुणे म्हणून आलेल्या ह्या कामगारांतील बरेचसे देशातच राहिले. तुलनेने त्यांची कुटुंबेही मोठी असतात. आज जर्मनीत ४१ लक्ष परकीय आहेत. १९७० सालाशी तुलना केली असता ही ७० टक्के वाढ आहे. जर्मनांची संख्या ५ कोटी ७० लक्ष आहे. १९७० च्या तुलनेने तिच्यात १३ लक्ष एवढी घट झाली आहे.

गेल्या वर्षी १ लक्ष ३ हजार परकीयांनी आपल्या देशात राहण्याची परवानगी मिळावी यासाठी अर्ज केले. ह्यांतील बरेचसे लोक वंशाने जर्मनच आहेत. सोव्हिएट रशिया आणि पूर्व युरोप ह्या देशांत 'पेरेस्ट्रोयका' मुळे नागरिकांना परदेशी जाण्याची अधिक मुभा आहे आणि ह्या गोष्टीचा फायदा घेऊन तेथे अडकलेले अनेक जर्मन 'मायदेशी' परतत आहेत. 'हे आपलेच लोक आहेत आणि त्यांचा आपल्या अर्थव्यवस्थेला उपयोग होईल' असे चॅन्सेलर कोल यांचे म्हणणे आहे. पण देशात येणाऱ्या प्रवाहाला आवर घातला पाहिजे ह्या बाजूला बहुमत आहे असे मतदानपाहणीवरून आढळून आले आहे. ह्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे २० लक्ष जर्मन बेकार आहेत आणि जर्मन शहरांतील भाडी वाढत आहेत. ह्या परिस्थितीत कुणालाही आणखी स्पर्धक नको आहेत. वैद्यकीय सेवा, निवृत्तिवेतन इत्यादींवरील खर्च सरकार कमी करीत असताना बाहेरून येणाऱ्या व्यक्तींच्या पुनर्वसनावर सरकारला ज्या मोठ्या रकमा खर्चाव्या लागतात, त्याही अनेकांना खुपतात.

चॅन्सेलर कोल ह्यांना ह्या लोकमताकडे दुर्लक्ष करणे परवडणार नाही. त्यांनी दुहेरी रणनीती आखली आहे. ज्या परकीयांनी कायमच्या वसतीसाठी परवानगी मागितली असेल पण ज्यांचे अर्ज अमान्य झाले असतील, त्यांची त्वरित देशाबाहेर रवानगी करावी; पण त्याबरोबरच ज्यांना अशी परवानगी देण्यात आली आहे त्यांना नागरिकत्वाचे हक्क सुलभतेने मिळावेत असा तिचा रोख आहे.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

## आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमालेची

## संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

- वैदिक संस्कृतीचा विकास । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ६० रु.
- हिंदुधर्माची समीक्षा (तृतीयावृत्ती) व सर्वधर्मसमीक्षा (प्रथमावृत्ती) – तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ५० रु.
- अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र० स्वामी केवलानंद सरस्वती — १०० रु.
- क्रोचेचे सौंदर्यशास्त्र : एक भाष्य । डॉ० रा० भा० पाटणकर — २० रु.
- पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ० सुमंत मुरंजन — २० रु.
- लोकशाहीचे धोके । पन्नालाल सुराणा — ८ रु.
- भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श । सौ० कमल पाध्ये — ८ रु.
- हिंदी साहित्यविचार । प्रा० प्यारेलाल गोहेल — ५ रु.
- महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना । चा० अ० दाभोलकर — ५ रु.
- श्री० यशवंतराव चव्हाण अभिनंदनग्रंथ — ४० रु.
- संशोधन साधना । डॉ० वसंत स० जोशी — २५ रु.
- ज्ञानदेव चिंतन (संपादित) । डॉ० वसंत स० जोशी — ३० रु.
- आनंदाचा डोह । प्रा० रा० ग० जाधव — १६ रु.
- भावार्थ रामायण ( श्री एकनाथ महाराजकृत ) बालकांड — १५ रु.
- तरंगयामिक व पुंजयामिक । मा० ग० टोळे — १० रु.
- आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी — ४० रु.
- वागीश्वरी । डॉ० गो० के० भट — २० रु.
- नवमानवतावाद व मानवाचा आदर्श — २५ रु.
- प्रस्थानभेद ( प्राचीन १४ विद्यांची माहिती ) पुनर्मुद्रण । गं० वा० लेले — १५ रु.
- बौद्धधर्माचा अभ्युदय आणि प्रसार ( पुनर्मुद्रण ) । प० ल० वैद्य — १० रु.
- चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान ( आवृत्ती दुसरी ) । सदाशिव आठवले — २५ रु.
- गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे — १० रु.
- इतिहासाचे तत्त्वज्ञान ( दुसरी आवृत्ती ) । सदाशिव आठवले — ६० रु.
- दासशूद्रांची गुलामगिरी ( भाग-२ ) । शरद पाटील — ७० रु.

संपर्क : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ,**
**वाई** ( जि. सातारा )


हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई